# क्षणभर-

विवाहविधि आणि प्रस्तावना, या गोष्टी कधीं काळीं अजीबाद नाहींशा होतील कदाचित्. परंतु तो काळ फार लांब आहे यांत मात्र शंका नाहीं.

प्रस्तुत कथासंग्रहांत सात प्रकाशित व सात अप्रकाशित गोष्टी आहेत. नदीच्या प्रवाहाप्रमाणें व्यक्तीची लेखनशैलीही अंतराअंतरानें वळणें घेत जात असते. मी १९२५ साली कथालेखनाला प्रारंभ केला. १९२५–३० व १९३०–३५ अशा पांच पांच वर्षांच्या दोन कालखंडांतून मी आतां तिसऱ्या कालखंडांत प्रवेश केला आहे. पहिल्या पांच वर्षांतील ‘ हिरा तो भंगला ’ ही एकच गोष्ट या संग्रहांत घेतां आली. तथापि तिच्यावरूनही रसिक वाचकांना माझ्या लेखनपद्धतींत झालेल्या स्थित्यंतराची कल्पना येऊं शकेल. वय, वाचन, विचार वगैरे अनेक विकारांपैकीं कोणकोणते लेखकांतील बदल घडवून आणतात हें पाहणें कांहीं कमी मनोरंजक नाहीं. मात्र स्थित्यंतर हें नेहमीं प्रगतिदर्शकच असतें असें नाहीं.

एवढ्या खुलाशानें नवनवीन शोधांत दंग असलेल्या माझ्या टीकाकारांचें समाधान होणें शक्य नाहीं हें उघड आहे. परवां अशाच एका संशोधक महाशयांनीं मी १९१२ पासून गोष्टी लिहित असल्याची स्वतःला सोईस्कर असलेली माहिती लोकांना सादर केली. तरी बरें! माझ्या जन्मापूर्वीच्या एखाद्या वर्षी त्यांनीं माझ्या लेखनाची सुरवात करून टाकिली नाहीं! बाकी त्यांनीं तसें केलें असतें तरी बिचारे वाचक त्यांचें काय करणार होते? ‘ तृणांकुर ’ या सदराखालीं या संग्रहांत दिलेल्या छोट्या सूचक गोष्टींवर गूढगुंजन म्हणून शेरा मारून त्यांना कथाप्रांतांत मज्जाव करण्याची शिफारसही करायला असले मल्लिनाथ कमी करीत नाहींत. व्यक्तिशः माझ्या गोष्टी चांगल्या नसतील, पण विविध भाषांतून उत्कर्षाला गेलेल्या या कथाप्रकाराची गूढगुंजन म्हणून

उगीच हेटाळणी करण्यांत काय अर्थ आहे ? दोन व दोन मिळून चार कां होतात याचेंही गूढ पडणारे लोक जगांत असतीलच ! पण तेवढ्यानें गणितशास्त्र हा कांहीं मूर्खांचा बाजार ठरत नाहीं.

तंत्र हा ललितलेखनाचा वेष आहे. एकनूर अदमी व दसनूर कपडा, असला प्रकार कुठेंही झाला तरी तो हास्यास्पदच व्हायचा. पण एखादा अदमी आपल्याला कपडेच नकोत असें म्हणूं लागला तर त्याला काय म्हणायचें? या संग्रहांत खास तंत्राकरितां म्हणून लिहिलेली अगर निखालस तंत्रहीन असा छाप असलेली एकही गोष्ट नाहीं.

जी गोष्ट तंत्राची तीच तत्त्वप्रतिपादनाची. तत्व व कला या परस्परविरोधी गोष्टी आहेत असें मला मुळींच वाटत नाहीं. मात्र त्यांतील एकाच्या अस्तित्वानें दुसऱ्याची उणीव भरून निघते ही कल्पना केव्हांही एकांगीच ठरेल. प्रकाश आणि पाऊस परस्परपूरक होऊन दगडाधोंड्यांनीं भरलेल्या पृथ्वीला फळाफुलांच्या शृंगारानें नटवितात. पण त्यांच्यापैकीं एकाचें काम दुसऱ्याच्या हातून होईल कां ?

कांहीं कांहीं क्षण युगासारखे वाटतात. प्रस्तावनेच्या क्षणाची गणना त्यांतच होईल. म्हणून प्रकाशकमित्र श्री. मोघे व मुद्रितें तपासणारे माझे मामेबंधु श्री. वा. मा. माईणकर यांनीं या संग्रहाच्या कामीं केलेल्या साहाय्याबद्दल त्यांचे आभार मानून इथेंच पूर्णविराम टाकतों.

टयु. इं. स्कूल, शिरोडें.
११-१-३७

वि. स. खांडेकर.

ती. सौ.

जानकीवहिनी भडकमकर

यांस

सादर

स

म

र्प

ण

# खांडेकरांचीं पुस्तकें

## प्रकाशित

| | | |
|---|---|---|
| १ | नवमल्लिका | ( कथा ) |
| २ | दत्तक व इतर गोष्टी | ,, |
| ३ | जीवनकला | ,, |
| ४ | ऊनपाऊस | ,, |
| ५ | दंवबिंदु | ,, |
| ६ | विद्युत्–प्रकाश | ,, |
| ७ | हृदयाची हांक | ( कादंबरी ) |
| ८ | कांचनमृग | ,, |
| ९ | दोन ध्रुव | ,, |
| १० | उल्का | ,, |
| ११ | वनभोजन | ( टीका ) |
| १२ | वायुलहरी | ( लघुनिबंध ) |
| १३ | रंकाचें राज्य | ( नाटक ) |
| १४ | गडकरी | ( व्यक्ति व वाङ्मय ) |
| १५ | आगरकर | ,, ,, ,, |

## पुढील

| | | |
|---|---|---|
| १ | फुलपांखरें | ( कादंबरी ) |
| २ | छाया | ,, |
| ३ | हिरवा चांफा | ,, |
| ४ | चांभाराचा देव | ,, |
| ५ | मोहर | ( बालकथा ) |
| ६ | सायंकाल | ( लघुनिबंध ) |
| ७ | नवचंद्रिका | ( कथा ) |

# अनुक्रम



———

# विद्युत्-प्रकाश

— १ —

श्री

कराची
प्रिन्सेस स्ट्रीट
ता. २०–३–३०

बालमित्र श्री. नानासाहेब प्रभु यांचे सेवेशीं,

कृ० सा० न० वि० वि०—

माझें हें पत्र पाहून तूं अगदीं आश्चर्यचकित होशील. बांबगोळाच वाटेल हा तुला. हो, पण विसरतच होतो मी. बांबगोळयाचें आश्चर्य आमच्यासारख्या प्राकृत लोकांना वाटायचें. तुझ्यासारख्या त्यांतल्या तज्ञाला—तें १९०५ साल, काळांतल्या लेखांचीं पारायणें करणारा तो टिळकभक्त नाना प्रभु, गोखल्यांची बाजू घेऊन त्याच्याशीं भांडणारा तो दादा देसाई, बांबच्या संशयानें या मित्रमंडळाच्या खोल्यांवर पोलिसांनीं घातलेला छापा, मळकट धोतर नेसून व फाटका सदरा घालून आपल्या खोलींतला गडी बनलेला तो नाना—कशीं विमानासारखीं भुर्रकन् जातात वर्षें! पण इतकीं वर्षें गेलीं तरी मला अजून त्या पोलिसांच्या छाप्याचें स्वप्न पडतें आणि अंगाला दरदरून घाम सुटून मी जागा होतों बघ.

नाना, जवळ जवळ पंचवीस वर्षांनीं आपली ही गांठ पडते आहे; आणि तीसुद्धां पत्ररूपानें! किती विलक्षण वाटतें हें. नाहीं? पण डॉक्टरीच्या धंद्यांतल्या गेल्या बावीस वर्षांच्या अनुभवानें मी जर कांहीं शिकलों

असेन तर ती एकच गोष्ट–जग मनुष्यांच्या खेळांकरितां निर्माण झालेलें नाहीं. दैवाच्या खेळांकरितां तें आहे. माणसें म्हणजे काय? नुसतीं खेळणीं! लांबचीं उदाहरणें कशाला देऊं? साधा एल्.सी.पी.एस्. असूनही इथें आल्यावर माझें लगेच बस्तान बसलें. एका गुजराथी शेटजीची बायको क्षयानें आजारी होती. माझ्या औषधानें तिला गुण आला. झालें, लगेच माझ्यावर लोकांच्या उड्या पडूं लागल्या. पण नशीब म्हणजे जुगार म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. रग्गड पैसा मिळवून मी नवा बंगला बांधला, पण त्यांत गृहप्रवेश करायला कांहीं सौभाग्यवती जगली नाहीं. ती क्षयानेंच गेली!

दुःखांत सुख एवढेंच कीं, एक गोड मुलगी मागें ठेवून ती गेली. विद्युत् नांव आहे तिचें! तूं आतां जवळ जवळ बंगालीच झालेला आहेस. तेव्हां हें नांव तुला फार फार आवडेल. ती झाली तेव्हां मला काव्याबिव्याचा नाद होता असें मात्र नाहीं हं! पण तिच्या जन्माची ती मध्यरात्र अजून आठवते मला. काळ्याकुट्ट ढगांनीं आभाळ भरून गेलें होतें अगदीं. बाहेर पाहिलें कीं भीतीच वाटे मनाला. बायकोची सुखरूप सुटका होईल कीं नाहीं या काळजीनें माझें मनही तसेंच झालें होतें. पण त्या काळ्याकुट्ट आकाशांत एकदम विजा चमकूं लागल्या आणि त्याच वेळेला माझ्या विद्युत्नें जगांत पाऊल टाकलें.

अंधार उजळून टाकणाऱ्या विजेप्रमाणें माझी मुलगी कांहीं तरी उज्वल कार्य करील अशी मी तिच्या जन्मापासून खूणगांठ बांधली होती. पण जगांत मनुष्याच्या अपेक्षा कधीं पूर्णपणें खऱ्या झाल्या आहेत का? विद्युत् बुद्धिवान आहे, उद्योगी आहे, प्रेमळ आहे; पण तिला उत्कृष्ट डॉक्टरीण करण्याचे माझे सारे प्रयत्न फुकट गेले. मुंबईच्या आर्टस्कूलमध्यें चित्रकलेचें शिक्षण घेत आहे ती सध्यां! नाना, तुझा काय अनुभव असेल तो असो; पण हीं अलीकडचीं पोरें थोडींशीं स्वच्छंदीच असतात. मीं एल्. एम्. एस्. ला जाण्याचा हट्ट धरला तेव्हां माझे वडील म्हणाले होते 'मी गरीब कोंकणी मनुष्य आहें. माझ्याकडून कढीभात मिळेल तुला. तूपपोळी हवी असली तर–'

लगेच मी एल्. सी. पी. एस्. ला जायचें कबूल केलें. पण या पोरीनें काय केलें, आहे ठाऊक? दवाखान्यांत माणसाच्या सांगाड्याचं चित्र असतं ना? त्याच्याकडे बोट दाखवून ती म्हणाली, 'दादा, डॉक्टर व्हायचं म्हणजे असलीं चित्रं बघत बसायचं! त्यापेक्षां दुसरीं सुंदर सुंदर चित्रें काढणें बरें नाहीं का?' काय उत्तर द्यायचं या प्रश्नाला? बाकी तिचा हात तसा छान आहे म्हणा! मासिकांत 'विद्युत्' या सहीनें तिचीं चित्रं येतात मधून मधून. पण चित्रांतसुद्धां या अलीकडल्या मुलांचें वेड आहेच! त्यांत काढतात काय? एक ऐटबाज तरुण नाहीं तर नाजुक नार! किती वेळां मीं विद्युत्ला सांगितलें– मल्लांचीं चित्रें काढ; भीम, बलभीम रंगीव; झांशीची लक्ष्मीबाई अगर चांदबिबी–छे:, नुसती हंसते ती! नाना, तूं कांहीं म्हण; पण तरुण पिढीच्या अंगीं कांहीं आपली रग नाहीं! ते गणेशोत्सवांतले मेळे, तीं पदें, त्या परदेशी कापडाच्या होळ्या, तीं काळ–केसरींतल्या लेखांचीं पारायणें, कांहीं म्हटल्या कांहीं नाहीं या तरुणांपाशीं! हे रडक्या कविता म्हणतील आणि नटवे पोषाख करतील.

एवढा मजकूर वाचून होतांच पत्रावर कराचीचा छाप आहे कीं ठाण्याचा आहे हें तूं पाहशील अशी माझी खात्री आहे. पंचवीस वर्षांनंतर पत्र लिहायला बसलों काय आणि एखाद्या रोग्याप्रमाणें आपल्या हकीगतीची पोथी सोडली काय? एका दृष्टीनें मी रोगीच आहें म्हणेनास! विद्युत्वर माझा सारा जीव! पण ती आपल्याच नादांत गुंग असते. वर्षाकांठीं महिनाभर सुटींत आली तरी समुद्रावर फिरायलाच जा, विमानाचें– जाऊं दे चित्रकलेच्या शिक्षणाकरितां म्हणून मुंबईत काढलीं आहेत तिनं पांच वर्षें! एखादा ख्रिश्चन नाहीं तर मुसलमान नवरा शोधून काढला नाहींन् म्हणजे मिळविली.'

आतां भिऊं नकोस! हरिदासाची कथा मूळपदावर आली हं! एक दोन महिन्यांपूर्वी वर्तमानपत्रांत मुंबईच्या डॉ. प्रकाशकुमार प्रभूंनीं घोड्यावरून पडलेल्या कुणा तरी संस्थानिकाचें मोडलेलें हाड फार चांगलें बसविल्याचें वाचलें होतें. त्या वेळीं वाटलें कीं, बंगाल्यांतही प्रभु हें

आडनांव असावें. पण परवांचा केसरी उघडून पाहतों तों त्यांत तुझा फोटो आणि कलकत्त्याच्या कार्पोरेशनमध्यें महाराष्ट्रीय मनुष्य असल्या-बद्दल तुझें अभिनंदन! खालचें त्रोटक चरित्र वाचून तर मी थक्कच झालों. बांबगोळयाऐवजीं सोन्याच्या गोळयांचाच कारखाना काढलास म्हणायचा तूं! बाकी कलकत्त्यासारख्या ठिकाणीं पुढें येणें म्हणजे कांहीं लहानसहान गोष्ट नाहीं! पत्र फार लांबलें! तूं कदाचित् मनांत म्हणशील 'हा प्रिस्क्रिप्शनंही अशींच लिहित असेल, तर तीं लिहून होण्यापूर्वींच रोगी राम म्हणत असतील.' पण नाना, प्रौढांचीं पत्रं म्हणजे कांहीं तरुणांच्या प्रेमपत्रिका नव्हेत! त्यांतून गेल्या पंचवीस बर्षांचें सांठलेलें प्रेम—करतोंच पुरें आतां. तुझ्या उत्तराची-वाट कशी बरं?— रोगी डॉक्टराची पाहतो तरशी वाट पहात आहे.

तुझा बाळमित्र
दादा देसाई.

\+ \+ \+

— २ —

कालीगंज
कलकत्ता
ता. २४-३-३०

प्रिय दादा,

तूं चक्रवाढव्याजानें परत केलेली गेल्या पंचवीस वर्षांतली प्रेमाची रक्कम मिळाली. किती आनंद झाला म्हणून सांगूं! प्रकाश डॉक्टरीच्या परीक्षेंत पहिल्या वर्गांत आला तेव्हां अगर मी कार्पोरेटर झालों तेव्हांच काय तो इतका आनंद झाला होता मला.

कदाचित् मुलगी चित्रकार झाल्यामुळें असेल—पण एखाद्या कलमबहादुराप्रमाणें पत्र लिहिलें आहेस तूं. माझा मुलगा हाडांचा डॉक्टर अन् मी पडलों व्यापारी; तेव्हां तुझ्याइतकं चांगलं पत्र लिहिणं जमणार नाहीं मला. पण—जाऊं दे तें.

दादा, गड्याचें सोंग घेऊन मी पुण्याहून पळालों तो कांहीं दिवस गोमांतकांत राहून मग थेट बंगाल गांठला. कानाला अगदीं खडा लावून घेतला तेव्हां. वाङ्मयाच्या नादानें माथें असें भडकतें म्हणून व्यापारांत पडायचें ठरविलें. टिळकांना झालेली शिक्षा, नाशिकचा खटला या साऱ्या गोष्टींमुळें आपल्या मुलखांत यायचेंच टाळलें मी पांचसहा वर्षें. इस्टेटीच्या लोभानें अगर हेव्यादाव्यानें वारस पोलिसांना पुन्हा चिथावतील अशी भीति वाटत असे त्यावेळीं मला.

नांव बदलून पांच-सांत वर्षें एकाच्या पेढीवर काढली आणि कलकत्त्यांत आलों. मग खरें नांव लावण्याचा धीरही आला. तिकडे जाऊन बायकोला व मुलाला आणलें आणि महाराष्ट्राला कायमचा रामराम ठोकला. इथें आल्यावर मुलाची मुंज केली. इकडच्या बाजूचें प्रकाशकुमार असें छानसें नांवही ठेवलें त्याचें ! मुंबईला एक प्रख्यात हाडांचा स्पेशालिस्ट डॉक्टर आहे. त्याच्या हाताखालीं अनुभव घेऊन मग प्रकाशनें परदेशला जावें असें माझें मत. म्हणून सहा महिन्यांपूर्वीं त्याला मुंबईला पाठविला. बाकी त्या संस्थानिकाचें हाड मोडलें तें प्रकाशाच्या चांगलेंच पथ्यावर पडलें. मोठे डॉक्टर त्या दिवशीं जाग्यावर नव्हते; त्यामुळें तें काम त्यानेंच केलें. संस्थानिक बेहद्द खूष आहेत त्याच्यावर. युरोपच्या यात्रेची सोय होण्याची खात्रीच आहे म्हणेनास.

हुषारीविषयीं ह्मणशील तर प्रकाशाचा हात धरणारा लाखांत मिळणार नाहीं. पण बेटा तुझ्या विद्युत्सारखाच विक्षिप्त आहे. गेल्या नाताळांत मुंबईहून उठला तो लाहोरच्या कॉंग्रेसला गेला. मीं त्याला किती वेळां सांगितलें कीं, डॉक्टराचा राजकारणाशीं औषधापुरता-सुद्धां संबंध नाहीं. पण तें पटतेंय कुठें त्याला ? डॉक्टर होऊन खूप पैसा मिळीव आणि मग देशाला लाख दोन लाखांची देणगी दे म्हटलें कीं, नुसता हंसतो झालं. डॉक्टरीच्या धंद्यामुळें मतंही मोठीं तऱ्हेवाईक झालीं आहेत त्याचीं ! एकदां कसल्या तरी जुन्या आठवणी निघाल्या. तूं नी मी ओंकारेश्वराच्याखालून नदीपलीकडे जात होतों पहा. नदीच्या गुडघाभर पाण्यांत कांहीं तरी पांढरें दिसलें आपल्याला. तें पहावयाला आपण

दोघे जवळ गेलों अन् फडक्यांत गुंडाळलेल्या त्या कोंवळ्या पोराची आठवण झाली कीं अजून शहारे उभे राहतात माझ्या अंगावर. बोलतां बोलतां ही गोष्ट निघाली आणि चट्कन् प्रकाश म्हणाला,

'संततिनियमनाचं ज्ञान जर त्या विधवेला असतं तर ही हत्या सहज टळली असती!' कसं आहे या तरुणाच तत्त्वज्ञान?

दादा, तूं म्हणतोस तेंच खरं. आपली रग कांहीं या तरुण पिढीच्या अंगीं नाहीं. एकीकडून हें गांधींचें नेभळट तत्त्वज्ञान आणि दुसरीकडून युरोपांतलें भयंकर ब्रह्मज्ञान! प्रकाश कॉलेजांत असतांनाची गोष्ट. त्यानें मला विचारलें 'वेल्स ठाऊक आहे का बाबा तुम्हांला?' मी म्हटलें, 'हो. शाळेंत भूगोल फार चांगला होता माझा!' पण हें उत्तर ऐकून आमचे प्रिन्स ऑफ वेल्स हंसूं लागले, तेव्हां कुठें मला कळलें कीं, वेल्स हें इंग्लंडमधल्या लेखकाचें नांव आहे. असेल लेखक–आम्हांला काय त्याचें? आमच्याकडे काय कमी महत्वाचे ग्रंथ आहेत? व्यासाशीं वेल्सची तुलना करा म्हणावें या तरुणांना! दर्यामे खसखस होईल त्याची!

प्रकाशच नव्हे, पण सारी तरुण पिढी अशीच बनत चालली आहे कीं काय कुणास ठाऊक! प्रकाशाच्या पाठच्या दोन बहिणी आहेत. त्या बाहेर फिरायला निघाल्या कीं पहावें. व्यापाऱ्यांच्या मुली आहेत कीं सिनेमानटी आहेत हेंच कळायचें नाहीं कुणाला! 'हे चोचले तूं चालूं कां देतोस?' असा प्रश्न तूं करशील. पण काय कर-णार बाबा? या पोरींना आंतून आईची फूस असते. घरांतल्या यादवींत आई नेहमीं मुलांच्या पक्षाला मिळायची हें ठरलेलेंच आहे.

प्रकाशला युरोपला पाठवायचें मीं लांबणीवर कां टाकलें आहे हें आतां तुझ्या लक्षांत आलें असेलच. काय नेम सांगायचा या नव्या पिढीचा? तिकडून एकादी पांढऱ्या पायाची सून घेऊन यायचे चिरंजीव! तेव्हां त्याचे दोन हातांचे चार हात करावे आणि मगच त्याला पुढल्या शिक्षणाकरितां पाठवावें म्हणतों मी. आतांपर्यंत तो इथेंच माझ्या नजरेखालीं होता. पण गेल्या सहा महिन्यांत मुंबईला कुणा तरुणीवर प्रेम

करायला लागला असला तर पंचाईतच व्हायची! पहा बोवा तुझी विद्युत् प्रकाशला देत असलास तर! जवळ जवळ गेलीं दोन तपें आपण अगदीं अंधारांतच होतों, नाहीं का? हें लग्न झालें तर एकदम विद्युत्प्रकाश पडेल या अंधारांत! व्यापाऱ्यालासुद्धां कोटी करतां येते हं, दादा.

सोबत प्रकाशचा अगदीं अलिकडचा फोटो पाठवीत आहे. तो विद्युत्‌ला दाखीव. नुसता पोस्टानें तिच्याकडे पाठवूं नकोस हं! मोठं बिकट आहे या अलिकडच्या पोरांचं तंत्र! कांहीं तरी निमित्तानें तिला कराचीला बोलीव आणि तिच्या पोटांत शिरून तिची कबुली घे.

विद्युत्‌चाही एक फोटो पाठवून दे. प्रकाशला चार दिवसांची रजा काढून मी बोलावतों आणि—खूप खूप लिहायचें होतें; तें आतां लग्नाच्या वाटाघाटीच्या वेळींच बोलूं. पण छे; त्या वेळीं तर मी मुळींच बोलणार नाहीं. कांहीं झालें तरी माझा वरपक्ष आहे.

तुझा बाळमित्र

**नाना प्रभु**

\+ + +

— ३ —

कराची

ता. १५—४—३४

प्रिय मित्राचे सेवेशीं,

कृ. सा. न. वि. वि.

फोटोची पोंच पूर्वीं दिलीच होती. जांवई मला पूर्ण पसंत आहे. हुंडा म्हणून माझा दवाखानाच देईन मी त्याला.

तुला पहावेंसें वाटतें म्हणून विद्युत्‌ला एक दोन पत्रें लिहिलीं; तर पोरटी उत्तरांत लिहिते काय? 'तुम्हांला मला पहावेंसें वाटतंय कीं आणखी कुणाला तसं वाटतंय?' आहे कीं नाहीं? आपल्या बापाला असें लिहिण्याची माझीच काय पण माझ्या वडिलांचीहि छाती

झाली नसती ! या विद्युल्लतेची चमक एवढ्यावरच थांबली नाहीं ! ती पुढें लिहिते, ' मला तुम्हीं पुष्कळदां पाहिलं आहे आणि पुढं पहाल. पण देशांत सध्यां काय चाललं आहे तें अधिक पाहाण्यासारखं नाहीं का ? महात्मा गांधी दांडीला गेले, मिठाचा कायदेभंग सुरू झाला— इत्यादि इत्यादि. ' मी जर गांधींबरोबर दांडीला गेलों असतों तर महिन्याच्या महिन्याला हिला तनखा कोण देणार होतें ? पण एवढा पोंच या अलीकडच्या तरुणांना आहे कुठें ?

वर्तमानपत्रें वाचून चहा पीत पीत देशभक्ति करणाऱ्या या तरुणांची नाडी आमच्यासारख्यांना कळत नाहीं कीं काय ? मी बराच आजारी आहे. पत्र पोंचतांच निघून ये, अशी तार आतांच केली आहे. वीज इमारतीवर पडूं नये म्हणून ती तारेंतून नेऊन जमिनींत सोडतात ना ? तशीच युक्ति आहे ही.

तुझा
दादा.

\+ + +

-४-

कलकत्ता
ता. २०-४-३४

प्रिय दादा,

विद्युत्‌चा फोटो मला आवडल्याचें तुला मागल्या पत्रीं लिहिलेंच आहे. प्रकाश आल्यावर तो दाखवून मग सविस्तर पत्र लिहावें म्हणून इतके दिवस वाट पाहिली. पण त्याचा पत्ता नाहीं अजून ! एकदां लिहितो—दवाखान्यांत फार काम आहे. दुसऱ्यांदा म्हणतो—मुंबईत चळ-वळ फार जोरांत आहे. फोटो पोस्टानें पाठवावा तर तेवढ्यानेंच बिन-सायचं कदाचित् ! मोठीं नाजूक झालीं आहेत अलीकडच्या तरुणांचीं मनं ! व्हायचींच ! जसें शरीर तसें मन अशी म्हण आहे ना !

फोटो पाहण्याचा अवकाश ! प्रकाश लगेच होकार देईल. प्रेमबीम या साऱ्या गप्पा आहेत दादा ! जेवणांत तूप आणि लग्नांत

रूप हेंच खरं एकदां वाटतें कीं, स्वतःच उठून मुंबईला जावें आणि- पण इथला व्याप कांहीं कमी नाहीं. महिनाभर मागें पुढें-पण तूं नी मी व्याही होणार हें आतां अगदीं निश्चित !

तुझा बाळमित्र

**नाना.**

\+ \+ \+

\- ५ -

कराची

ता. २५-४-३४.

प्रिय मित्राचे सेवेशीं कृ. सा. न. वि. विः-

नाना, काय विचित्र योगायोग पहा ! मी त्या दिवशीं विद्युत्‌ला तार करून घटका झाली नाहीं तों तिचीच तार आली मला. बरोबरीच्या कांहीं मित्रमैत्रिणींसह कोंकण व गोमांतक पहाण्याकरितां त्याच दिवशीं मुंबईहून गेली ती. चित्रकाराच्या दृष्टीनें तो प्रदेश पाहण्यासारखा आहे हें खरें; पण पहायला कांहीं काळवेळ नको का ? देशांत चहूंकडे आग पेटली आहे! आणि मित्रमैत्रिणींचें हें टोळकें चाललंय सुंदर देश पहावयाला मागच्याच पत्रांत पोरटीनें आजीबाईचा आव आणून केवढा उपदेश केला होता मला ! आतां परत आल्यावर तिचंच पत्र तिला वाचायला देतों !

'मधून मधून मी खुशाली कळवीन; पैशाची कांहीं जरूर नाहीं.' असें ती तारेंत म्हणते. प्रवासाला निघालेल्या माणसाला पैशाची जरुरी नाहीं ! तुझ्या प्रकाशाचें तें संततिनियमनाविषयींचें बोलणें अशा वेळीं आठवतें आणि मनांत कसें चर्र होतें ! आईबापांचीं हृदयें आपल्यासाठीं तिळतिळ तुटत असतात याची या पोरांना कल्पना तरी असते का ?

विद्युत् मुंबईला आपल्या चुलत मावशीच्या घरीं राहते. त्या पत्त्यावर तिला आज अगदीं खरमरीत पत्र पाठवलें आहे.

तुझा

**दादा.**

— ६ —

कलकत्ता

ता. १—५—३४

प्रिय दादा,

ही तरुण मंडळी इथून तिथून सारखी ! तुझी विद्युत् गोमंतक बघण्याकरितां निघून गेली. आमचा प्रकाश दुखावलेल्या हाडाच्या सुजेवर कसलीशी वनस्पति आंबोलीच्या जंगलांत आहे म्हणे, ती शोधण्याकरितां एकाएकीं निघून गेला आहे ! कसा आहे मामला ? तारुण्य म्हणजे वारं हें खरं ! प्रकाशाला असा चापणार आहें मी आतां !

तुझा

**नाना.**

\+ + +

— ७ —

कराची

ता. २०—५—३४

प्रिय मित्राचे सेवेशीं, कृ. सा. न. वि. वि.—

मध्यंतरीं विद्युत्‌चीं दोन तीन पत्रें आलीं. पण सारीं दोन ओळींचीं. अजून ती गोंव्यांत गेलेली दिसत नाही. एका पत्रावर बेळगांवचा छाप होतां. दुसऱ्यांवर सांवतवाडीचा ! तिकडल्या सृष्टिसौंदर्यांत अगदीं गुंग झालेली दिसते ती ! आतां काय? माडांच्या बागांत आणि आंबराईत प्रेमाच्या कानगोष्टी करणाऱ्या चित्रांना बहर येणार ! नाना, कला, सौंदर्य वगैरे वगैरे आमच्या वेळेला कांहीं नव्हतेंच का रे ? पण त्याच्यापलीकडे कांहीं आहे हें कळतच नाहीं या तरुणांना ! नाहीं तर आम्हीं वंगभंगाच्या वेळीं तुझ्या खोलींत कर्झनचा एक फोटो जाळला होता तें आठवतें ना !

तुझा

**दादा.**

ता. क.–पत्र पाकिटांत घालतां घालतां विद्युत्‌चें पत्र मिळालें. दुसऱ्याकडून लिहवलें आहे तें तिनें! कुठल्याशा डोंगरावर सृष्टिसौंदर्य पहायला गेली होती, ती पाय निसरून पडली आणि उजव्या हाताच्या मनगटाचें हाड दुखावलें म्हणे तिचें! सिंहगडावर पूर्वी आम्ही धांवत चढलों होतो; आणि ही आजची पिढी–जाऊं द्या! आपलेच ओंठ आहेत. एक मात्र बरें झालें. मनगट मोडल्यामुळें ती पुढल्याच आठवड्यांत इकडे येत आहे. तिचा हा अपघात म्हणजे अगदीं ईश्वरी नेमानेमच वाटतोय मला. प्रकाशला तिचा हात पाहण्यासाठीं इकडे पाठवून दे. त्यानें तो एकदां हातांत घेतला म्हणजे तूंही सुटलास आणि मीही सुटलों.

तुझा
**दादा.**

\+ + +

–८–

कलकत्ता
ता. २५–५–३४

प्रिय दादा,

तुझें पत्र पोंचलें. विद्युत्‌चा दुखावलेला हात नाटकें–कादंबऱ्या लिहिणारांच्या चांगलाच उपयोगी पडला असता; पण आम्ही पडलों या रूक्ष व्यवहारांतलीं माणसें. प्रकाशला कराचीला जा म्हणून पत्र पाठवायला त्याचा नक्की पत्ता तरी ठाऊक हवा ना मला? तो तिकडे आंबोलीच्या आसपास आहे त्या वनस्पतीच्या शोधांत! आठ दिवसांपूर्वी त्याचें पत्र आलें होतें; त्याच्यावर कुठल्या तरी खेड्याच्या पोष्टाचा छाप होता.

तूं स्वतः डॉक्टर आहेस आणि कराचींतही खूप चांगले डॉक्टर असतील! त्यामुळें विद्युत्‌च्या हाताची काळजी वाटत नाहीं मला इतकी! पण त्या वनस्पतीच्या नादांत प्रकाशनें पुढें येण्याची केवढी चांगली संधि दवडली पहा. तुला अजून कळली नसेल कदाचित् ती बातमी. कोंकणांतल्या खेड्यापाड्यांत

कायदेभंग अगदीं जोरानें सुरू आहे म्हणे. सोबत ‘ हिंदीस्थान ’ या इथल्या दैनिकांतलें कात्रण पाठवीत आहे. तें वाचून पहा, म्हणजे समजेल. तिकडे मराठी वर्तमानपत्रांकडे या बातम्या जाऊंच देत नसेल सरकार ! पण एका स्वयंसेवकांच्या पथकांत एक बंगाली तरुण होता. त्यानें ही बातमी गुपचूप आपल्या घरीं कळविली आणि तिथून ती हिंदीस्थानाला मिळाली. प्रकाशनें जाऊन त्या शूर मुलीच्या हाताचें हाड नीट बसविलें असतें तर पुढल्या धंद्याच्या दृष्टीनें तें किती छान झालें असतें. पण तो बसलाय्‌ वनस्पति शोधीत !

तुझा
**नाना.**

\+ + +

– ९ –

## हिंदीस्थानमधील उतारा

## “ खरी राष्ट्रकन्या. ”

‘ता. १५ मे रोजीं कोंकणांतील आंबराई या गांवीं मुंबईच्या स्वयंसेवक पथकानें समुद्राचें पाणी आणून कायदेभंग करण्याचें ठरविलें. पोलिसांचा बंदोबस्त अगदीं कडेकोट होता. पथकाच्या अग्रभागीं कु. चपलाबाई हातांत तिरंगी झेंडा घेऊन चालल्या होत्या. पोलिसांनीं मनाई केलेल्या जागेंत डॉ. किरण व इतर स्वयंसेवक यांच्यासह त्या जाऊं लागल्या. लाठी सुरू झाली तरी स्वयंसेवक मागें हटले नाहींत. चपलाबाईच्या उजव्या हाताच्या मनगटावर घाव बसले तरी त्यांनीं हातांतील झेंडा सोडला नाहीं. मात्र त्यांचें मनगट चांगलेंच दुखावलें आहे. पथकांतील डॉ. किरण यांनीं त्यांचें दुखावलेलें हाड नीट बसविलें. नाहीं तर इकडील खेडेगांवांत तज्ञ डॉक्टर मिळणें शक्य नाहीं. किरण नसते तर कु. चपलाबाईचा उजवा हात जन्माचाच निकामी झाला असता. चपलाबाई व किरण यांचा वेष महाराष्ट्रीय पद्धतीचा आहे; पण बाईंना गुजराथी व डॉक्टरांना बंगाली चांगलेंच येतें. हिंदुस्थानच्या इतिहासांत यापुढें गुजराथ व बंगाल सुवर्णाक्षरांनीं लिहावी अशीं कृत्यें करणार आहेत हेंच

यावरून सिद्ध होत नाहीं काय ? पोलिसांनीं आज डॉ. किरण यांना अटक केली. मोडलेलीं हाडें बसविणारे डॉक्टर जोंपर्यंत जवळ आहेत तोंपर्यंत स्वयंसेवक आपल्याला भीक घालणार नाहींत असें त्यांना वाटत असावें ! पण ही समजूत खोटी आहे हें लवकरच त्यांच्या अनुभवाला येईल. कु. चपलाबाई यांना प्रसिद्धीचा तिटकारा असल्यामुळें त्यांनीं आपला फोटो कुणालाच काढं दिला नाहीं.'

\+ \+ \+

– १० –

कराची
ता. २९–५–३४

प्रिय नाना,

विद्युत् काल इथें आली. डोंगरावरून पडून तिच्या मनगटाचें हाड बरेंच दुखावलें असावें. पण कोंकणांतल्या डॉक्टरनें तें चांगलें बसविलें आहे. मात्र अजून आठ पंधरा दिवस त्या हातानें तिला दोन ओळीसुद्धां लिहितां येणार नाहींत. कोंकणांतल्या खेड्यांत इतका कुशल डॉक्टर मिळावा हें आश्चर्य नव्हे का? साराच दैवाचा खेळ ! मावशीला माझी परवानगी आहे असें खोटेंच सांगून ही कोकणांत गेली होती. त्याचेंच प्रायश्चित आहे हें.

हिंदीस्थानमधील उतारा दाखवून ( त्याचें भाषांतर आतां मराठी वर्तमानपत्रांतूनसुद्धां आले आहे.) मी विद्युत्‌ला म्हटलें 'कोंकणांत जाऊन पराक्रम गाजविणारी ही गुजराथी मुलगी पहा.' 'बघू या' असें म्हणून त्या मजकुरावरून पुन्हा दृष्टि फिरवून तिनें विचारलें, 'कुठं आहे ती ? यांत फोटोबिटो कांहींच नाहीं–'

'फोटो द्यायला अलीकडची नटवी तरुणी नाहीं ती' मी थोडासा रागानेंच म्हणालों. पण तिनें हंसत हंसतच प्रश्न केला 'ही कु. चपला म्हातारी आहे असं कां तुम्हांला वाटतं दादा ?' काय उत्तर देणार असल्या प्रश्नाला ? सगळीच तरुण मंडळी कांहीं थिल्लर नसतात हें मात्र खरें !

तुझी व प्रकाशची सारी हकीगत मीं तिला सांगितली. 'मला लग्नच करायचं नाहीं' म्हणून सांगितलंन् पोरीनं ! अजून फोटो दाख-

विला नाहीं मीं प्रकाशचा! म्हटलं इतक्यांत तो मुंबईला परत आला तर प्रत्यक्षच पाहील ही त्याला! पण नाना, पोरीचं लक्षण कांहीं ठीक नाहीं दिसत! कुणा भलत्याच जातीच्या माणसाशीं लग्न करते म्हणून हट्ट घेऊन बसली तर काय करायचं?. तारुण्य म्हणजे नुसतं वारं हें तुझं म्हणणंच खरं! या वाऱ्याची मोट कशी बांधायची?

तुझा
**दादा.**

— ११ —

कलकत्ता
ता. ४-६-३४

प्रिय दादा,

तूं विचारतोस, वाऱ्याची मोट कशी बांधावयाची! पण वारं एकच नाही; दोन आहेत तीं! काल प्रकाशचें पत्र आलें. कुठून? तर रत्नागिरीहून तुरुंगांत जातां जातां टाकविलं आहे तें कुणा स्नेह्याकडून. वनस्पति शोधतां शोधतां बेकायदेशीर मीठ सांपडलें त्याला! आहे कीं नाहीं विद्वान? शिक्षा सहा महिन्यांची झाली आहे. पण मागचे ते संस्थानिक असल्या कायदेभंगवाल्याला परदेशीं जाण्याकरितां पैसे देतील का आतां?

ही एक गोष्ट झाली. दुसरी लग्नाची. त्यानें ह्मणे त्या कु. चपलेला लग्नाचें वचन दिलें आहे! चांगली बायको शोधून काढलीन्! तिचा हात बरा झाला तर ठीक; नाहीं तर स्वयंपाकाची पाळीसुद्धां याच्यावर यायची! तिचा बाप काय करतो, घरची स्थिति कशी आहे, याच्याविषयीं एक अक्षरसुद्धां नाहीं पत्रांत. तुरुंगांत लग्नें होत नाहींत म्हणून बरें आहे; नाहीं तर लग्नपत्रिकाच यायची आम्हांला रत्नागिरीहून! काय करावं तें अगदीं सुचेनासें झालें आहे. तारुण्य म्हणजे शुद्ध वारं! पण हें वारं काय करतं? झाडं मोडतं, होड्या बुडवितं आणि डोळ्यांत धूळ घालतं. कांहीं सुचत नाही अगदीं.

तुझा
**नाना.**

– १२ –

तार

कराची

ता. ४–६–३४

विद्युत्‌ला प्रकाशचा फोटो दाखविला. तिची पूर्ण संमति. प्रकाश कुठं आहे ? त्याला तारेनें बोलीव. –दादा.

\+ + +

– १३ –

तार

कलकत्ता

ता. ५–६–३४.

प्रकाश रत्नांगिरीच्या तुरुंगांत आहे. तो विद्युत्‌शीं लग्न करील असें वाटत नाहीं. सविस्तर पत्र काल पाठविलें आहे.

–नाना.

\+ + +

– १४ –

कराची

ता. ८–६–३४.

प्रिय नाना,

तारुण्य म्हणजे वारें हें तुझें म्हणणें अक्षरशः खरें आहे. पण या वाऱ्याचे प्रताप मात्र तुझ्या वर्णनापेक्षां पुष्कळदां निराळे होतात. हें वारें उकाड्यानें शिजून निघणाऱ्या शरिराला शीतलता देतें, बागेंतल्या कळ्या उमलवितें आणि पळून जाणाऱ्या ढगांना पकडून आणून पृथ्वीला पाऊस देतें.

काव्याची स्फूर्ति व्हावी असाच प्रसंग आहे हा ! तुझी तार विद्युत्‌ला दाखविणें अगदीं जिवावर आलें माझ्या. मी गप्पच बसलों. पण तारेंतली बातमी ठाऊक नसतांनासुद्धां ती तीन चार दिवस फार

उदास कां आहे हें मला कळेना. ती फिरायला गेली असतांना तिच्या टेबलाची मी मुद्दाम तपासणी केली. ड्रॉवरला कुलुप होतें. टेबलावर चिठ्ठीचपाटी कांहीं नाहीं. सहज टेबलाखालच्या टोपलीकडे नजर गेली. किती फाडलेले कागद पडले होते तिच्यांत! पोरीला हातानें कांहीं लिहायला येत नाहीं अजून. मला शंका आली. कागद कुठून आले हे? चटकन त्यांतील कांहीं उचलून पाहिले; सारे फाडलेले नोटपेपर. चिठोऱ्यावर लहान मुलासारख्या अक्षरांत 'प्रिय' 'पोंचलें' 'प्रकाश' 'तुरुंगांत' 'लबाड' 'किरण' 'हात' असलें शब्द दिसले मधून मधून. अक्षर मनासारखें न आल्यामुळें सारे कागद फाडून टाकले असावेत तिनें. लगेच ड्रॉवरचें कुलुप फोडून मीं पाहिलें. वरच रत्नागिरीच्या छापाचें पत्र! तें पत्र म्हणजे काय? कबुली जबाबच. तुझ्या भीतीनें प्रकाशनें किरण हें नांव घेतलें. पण–आणि तुझ्या प्रकाशची चपला म्हणजे विद्युत्. तिचा दुखावलेला हात–सारें सारें येईल आतां तुझ्या लक्षांत! विद्युत् बाहेरून फिरून आली तेव्हां मीं तिला म्हटलें, 'विद्युत्, कलकत्त्याहून पत्र आलंय तुझ्या सासऱ्याचं!'

'काय म्हणतात ते?' गंभीर मुद्रेनें तिनें विचारलें.

'तुझं सासरचं नांव चपला ठेवणार म्हणतात ते!'

पोरगी चपापली, हंसली आणि लाजेनें तिनें माझ्या कुशींत असें तोंड लपविलें म्हणतोस! अगदीं लहान पोरीसारखं!

तुरुंगांत एकच पत्र वाचायला देतात म्हणे. तेव्हां प्रकाशच्या पत्रांत माझा म्हणून एवढाच मजकूर लिही—

'लग्न आंबोलीच्या जंगलांतच करूं या.'

नाना, आम्ही प्रौढ माणसं म्हणजे जुन्याकाळच्या मशाली! पण हीं पोरं? नुसता विद्युत्प्रकाश!

तुझा

दादा.

(१९३४)

———

# विस्तवाशीं खेळ !



कांकडीचा मधुर कायरस चाखतां चाखतां मीं निर्मलेला म्हटलें, ' फडक्यांच्या नायिकांतसुद्धां आढळणार नाहीं हा गुण ! '

' कसला ? ' तव्यावरली भाकरी निखाऱ्यावर टाकीत तिनें विचारलें,

' हा भलता हातगुण—'

' म्हणजे ? मी चोर आहे वाटतं ? ' तिनें मान वळवून लटक्या रागानें माझ्याकडे पाहात म्हटलें. निखाऱ्यावर फुगत चाललेल्या भाकरीसारखाच तिचा असला रुसवाफुगवा असे; त्यामुळें संभाषणाला नेहमींच अधिक गोडी येई. म्हणून मी लगेच उत्तरलों, ' तूं चोर आहेस हें सांगायला साक्षीदार कशाला हवा ? '

' कधीं केली मी चोरी ? ' तिनें उन्हउन्हीत भाकरी माझ्या पानांत घालीत विचारलें.

' नाहीं आठवत ? '

' अं हं. '

' चार वर्षं झालीं. '

' सांपडली कीं नाहीं ती चोरी ? '

' चोराला शिक्षासुद्धां झाली ! '

' कसली ? '

' जन्मठेप. '

' अगदीं अंदमान ? '

' हो, मुंबईच्या मानानें कोंकण म्हणजे अंदमानच कीं. '

ती हंसूं लागली.

' चोरीची नक्की तारीख सांगूं का ? '

'भारीच तीव्र आहे हं इकडची स्मरणशक्ति!'

'चार वर्षांपूर्वीची संध्याकाळ. आठवतीय् कां? माझ्यासारखा एक अनोळखी तरुण मुंबईतल्या एका बिऱ्हाडीं गेला. तुझ्यासारख्या एका अठरा एकोणीस वर्षांच्या मुलीनं चहा आणून दिला त्याला. चहा पिऊन तो बाहेर येतो तों काय!–'

'कांहींतरी हरवल्यासारखं वाटलं त्याला, होय ना?'

'अट्टल भामट्यांबद्दल प्रसिद्धच आहे मुंबई!'

'पण साक्षीपुराव्यावांचून एकाद्याला भामटा म्हणणं–'

'तोंडी पुरावा आधीं दाखल करतों. अग सुधा, अग सुधा!'

'इश्श, हें काय?'

'साक्षीदाराला बोलावला. पुरावा पाहिजे ना तुला त्या चोरीचा?'

इतक्यांत तीन वर्षांची चिमुकली सुधाच सोप्यावरून धांवत धांवत आंत आली.

'चिपाई आलाय् दादा!'

'शिपाई!' निर्मला सुधेच्या तोंडाकडे आश्चर्यानें पाहात उद्गारली.

'फुगलेली भाकरी करपली हं!' तिच्या भित्रेपणाची थट्टा करण्याकरितां मीं म्हटलें. मानेला एक मधुर निषेधार्थक झटका देत ती लगबगीनें बाहेर गेली.

तें झालें होतें असें:–सहा महिन्यांपूर्वी कायदेभंगाची चळवळ पुन्हा सुरू झाली ना? तेव्हां सरकारनें भराभर भयंकर ऑर्डिनन्स काढले. सत्याग्रही माणसांना कुणीही मदत करूं नये, केल्यास–इत्यादि. निर्मला मूळचीच भित्री. त्यांत हा ऑर्डिनन्सचा बागुलबोवा! एवढ्यावर नाहीं हें संपलें. त्यावेळीं एके दिवशीं मध्यरात्रीं खादीचें कुडतें घातलेला एक दाढीवाला आमच्या घरीं आला. तो नि मी पहाटेपर्यंत बोलत बसलों होतों. निर्मलेला तें सारें कसेंसेंच वाटलें. सत्याग्रहाविषयींच्या या सहानुभूतीनें सुखवस्तुपणाची हायस्कूलची हेड्मास्तरकी मी गमावून बसेन

कीं काय अशी भीति पदोपदीं तिच्या मनांत उत्पन्न होई. यामुळें 'शिपाई' हा शब्द ऐकला कीं ती अगदीं गोंधळून जात असे.

माझी भाकरी संपते इतक्यांत ती आंत आली व हंसत हंसत म्हणाली 'हात्तिच्या ! काय भिववलं मला पोरटीनं ! पोष्टाचा शिपाई आहे तो !'

शाळेंतल्या रिकाम्या जागेकरितां तारेनें कुणी अर्ज पाठविला कीं काय, हें मला कळेना. पण निर्मलेची थट्टा करण्याकरितां मी म्हणालों, 'कसलं वॉरंट आणलंय् शिपायानं ?'

'दोन रुपये सात आण्यांचं !'

माझ्या कांहींच लक्षांत येईना. तिनें खुलासा केला,

'व्ही. पी. आलीय् एक.'

'कसली ?'

'कादंबरीची !'

'फडक्यांची झालीय् वाटत नवी एकादी ?–'

तिनें होकारार्थी मान हालविली.

'नांव काय ?'

'निरंजन–'

'कांहींतरीच सांगतेयस्. अल्लख निरंजनांशीं फडक्यांच्या पात्रांचा काय संबंध ?'

घाईघाईनें हात धुवून 'पाकिटांतले पैसे घेतें हं–' असें म्हणत ती बाहेर गेली.

माझी निर्मला म्हणजे फुलपांखरूं होतें नुसतें. फडक्यांची नवी कादंबरी म्हणजे तिच्या दृष्टीनें नुकतेंच उमललेलें सुंदर फूल ! मग तिनें त्याच्याकडे धांव घ्यावी यांत नवल कसलें ? पण लगेच माझ्या मनांत आलें– हें फुलपांखरासारखें आयुष्य बरं कां ? जगांत सगळीकडे फुलेंच असतीं तर गोष्ट निराळी ! पण तसा कुठें अनुभव येतो ? आयुष्यांत फुलें थोडीं. कांटे फार !

या विचारानें माझें मलाच हंसू आलें. जगांत कांटे फार असतील;पण माझ्या जीवनमार्गावर तर फुलेंच फुलें होतीं ना? निर्मला-सुधा सुख-वस्तुपणाची नोकरी! लग्नमंडपांत स्मशानवैराग्याचे विचार एकाद्याच्या मनांत येणें बरें कां?

कपडे घालतां घालतां या विचित्र विचाराचा उगम माझ्या लक्षांत आला. शाळेतल्या त्या रिकाम्या जागेकरितां आलेले पन्नास साठ अर्ज मीं सकाळींच वाचले होते. पंचवीस रुपयांची नोकरी! जाहिरातींत मॅट्रिक पाहिजे म्हणून लिहिलें होतें. पण अर्जांत चार पांच पदवीधरांचे-सुद्धां अर्ज होते. त्यांचेंही खरेंच होतें एका दृष्टीनें. पदवीधर मॅट्रिक असतोच कीं! ते अर्ज आणि त्यांतील ती केंविलवाणी भाषा वाचतां वाचतां माझें मन कसें खिन्न होऊन गेलें होतें.

वाटलें-हे सारे पंचवीसाच्या आंतील तरुण। वय, विद्या वगैरे दृष्टींनीं फडक्यांच्या कादंबऱ्यांतल्या नायकांत आणि यांच्यांत काय अंतर आहे? या पन्नास साठ तरुणांत चार दोन तरी बुद्धिवान असतीलच कीं नाहीं? लाथ मारीन तिथें पाणी काढीन असें म्हणण्याचें हें त्यांचें वय! मग यांनीं असे हातपाय कां गाळावे? पंचवीस रुपड्यांच्या जागेकरितां इतकें कां धडपडावें? टेबलावर पसरलेले ते अर्ज पाहून माझ्या डोळ्यांपुढें जें चित्र उभें राहिलें तें-कुणी कांहीं म्हणो, कागदांचा तो पसारा पाहून लग्नघराबाहेर उष्टया अन्नाकरितां धडपडणाऱ्या भिकाऱ्यांची आठवण झाली मला.

आणि त्याच वेळीं मनांत आलें-कादंबरींतलें जीवन म्हणजे अमृत! पण सत्यसृष्टींतलें आयुष्य हें विष आहे नुसतें. अमृत पिऊन अमर झालेल्या देवांशीं विषानें तडफडणाऱ्या माणसांची तुलना करण्यांत काय अर्थ आहे!

निर्मला विडा घेऊन आली. तो तोंडांत टाकीत मी म्हटलें, 'केवढीशी आहे कादंबरी?'

'तीनशें पानांची.'

'मग काय! संध्याकाळच्या चहापर्यंत पुरी होईल?'

'आधाशीपणानं वाचतें खरी मी !'

'हा आधाशीपणा नव्हे !'

'मग काय खादाडपणा वाटतं ?'

'छेः ! फुलपांखराचा स्वभाव आहे हा ! तीं मध गोळा करीत या फुलांवरून त्या फुलावर जातात ! तूं या पानावरून त्या पानावर—'

'फुलपांखरापेक्षां मधमाशीच आहें मी !'

'ती कशी ?'

'वाचतां वाचतां चांगल्या भागांवर मी खुणा करतें. तो खरा मध आयताच मिळतो आपल्याला !'

मला हंसूं आलें. पण सायकलकडे जात मीं म्हटलें, 'मी नाहीं म्हणणार तुला मधमाशी. एकदां तरी कुणाला केलाहेस का दंश ?'

\+ \+ \+

सायकलवरून माझें शरीर शाळेकडे जात होतें. पण मन विचारांच्या विमानांतून कुठें फिरत होतें तें माझें मलाच कळेना. सायकलपेक्षांही अधिक चपलतेनें तें विमान वळणें घेत होतें. फडक्यांच्या लालित्यपूर्ण कादंबऱ्या—टेनिसच्या खेळासारख्याच नाहींत का त्या ? पण आयुष्य हा टेनिसचा गुळगुळीत खेळ नाहीं ! तो क्रिकेटचा दणदणीत—

शाळेंत प्रार्थनेच्या वेळीं चाललेलें महाराष्ट्रगीत ऐकूं येऊं लागलें.

"अटकेवरि जेथील तुरंगिं जल पिणें ।
तेथ अडे काय जलाशय नदाविणें ॥"

सायकलच्या पिशवींतला अर्जांचा भारा माझ्या डोळ्यांपुढें उभा राहिला ! एके काळीं आमचे घोडे अटकेचें पाणी पीत होते; आणि आता ? जिथल्या तिथें पेंड खाऊं लागले आहेत ते ! पेंड तरी कुठं मिळतेय् त्यांना ?

शिपायाच्या हातांत सायकल देऊन मी माझ्या खोलींत गेलों.

'तेथ अडे काय जलाशय—' हा चरण गुणगुणत मी आंत पाऊल टाकलें तों एक पंचवीस सव्वीस वर्षांचा गृहस्थ खुर्चीवर बसलेला !

मळकट कपडे, किंचित् पिंजारल्यासारखे दिसणारे केस, उदास चेहरा, शून्य दृष्टि—मला वाटलें कुणी वेडा तर नाहीं ना दार उघडें पाहून आंत येऊन बसला? पण त्या गृहस्थानें लगेच उठून नमस्कार केल्यामुळें ही शंका नाहींशी झाली.

‘ कांहीं काम आहे का माझ्याकडं ?’ मी खुर्ची पुढें सरकावून घेत प्रश्न केला.

‘ आतांच मोटारनें आलों. आपल्या शाळेंत एक जागा रिकामी–’

‘ आज भरणार आहोत आम्ही ती ! पण मॅट्रिक मनुष्य पाहिजे आम्हांला ?’

‘ मी अंडर ग्रॅज्युएट आहे. ’

किंचित् आश्चर्यानें मी विचारलें ‘ कुठपर्यंत शिकलाय् आपण ?’

‘ डॉक्टरीच्या पांचव्या वर्षांत होतों ? ’

‘ एम्. बी. बी. एस्. च्या ’

‘ हो !’

घोड्याचं रूपांतर उंटांत होण्यापेकींच चमत्कार होता हा ! डॉक्टरीच्या मार्गावरला मनुष्य शाळामास्तर व्हायला येतो ! पुन्हा मनांत शंका आली—वेडा तर नाहीं ना हा? दूरदर्शीपणानें मीं म्हटलें, ‘ कायम शिक्षक नेमायचाय् आम्हांला. ’

‘ कायम रहायला तयार आहे मी. ’

‘ मग एम्. बी. बी. एस्. कसे होणार तुम्ही ?’

‘ कधींच सोडून दिला मीं तो नाद !’

नाद सोडून दिला ! चांगलें सुंदर घर बांधायचें आणि वर छप्पर घालायचें नाहीं त्यांतलाच हा एक प्रकार ! माझें आश्चर्य द्विगुणित झालें.

‘ कां सोडून दिलात तो नाद ?’ मीं प्रश्न केला. तो करतांना या गृहस्थाला दुसरा कसला नाद तर नसेल ना, असा संशय मात्र मनांत उभा राहिला.

‘ शिकण्याची उमेदच जळून गेली माझी !’

शिकत असतांना याचें सुंदर मुलीशीं लग्न झालें असेल आणि ती मृत्यूमुखीं पडली असेल! माझ्या मनांत कल्पना चमकून गेली. निर्मलेवरल्या माझ्या प्रेमाची आठवण होऊन मी सहानुभूतीनें म्हटलें 'अरेरे!'

'त्यांत चूक माझीच होती मास्तरसाहेब! पण चुकीनं मनुष्य मोटारखालीं सांपडला तरी तो मरतोच! नाहीं?'

तो थोडासा हंसला; पण दगड घांसून साफ केला म्हणून तो, द्रवतो थोडाच! त्याचा हास्ययुक्त चेहरा मला तसाच भकास वाटला.

'काय चूक झाली तुमची?' कांहीं तरी बोलायचें म्हणून मी बोललों.

'विस्तवाशीं खेळलों मी!'

'म्हणजे?'

'काय करायचीय ती कर्मकथा? विस्तवावांचून जगांत कुणाचंच चालायचं नाहीं. पण त्याच्याशीं खेळलं कीं मनुष्य असा भाजून निघतो म्हणतां! आठवण झाली कीं, अजून कशी आग पेटते इथं!'

त्यानें दोन्ही हातांनीं आपली छाती घट्ट आंवळून धरली. त्याच्या पापण्यांच्या कडा किंचित् ओलसर झाल्यासारख्या दिसल्या. मला त्याच्याकडे पाहवेना. त्याला जागा द्यावी कीं देऊं नये याचा निर्णयही होईना. पण त्याच्यासाठीं कांहीं तरी करावें असें मात्र वाटूं लागलें.

'संध्याकाळीं घरीं भेटाल का तुम्ही मला? म्हणजे शांतपणानं—'

'बरं—' म्हणून नमस्कार करून तो निघून गेला.

मी सातवीचें इंग्रजी घ्यायला गेलों. गोष्टीचा मथळा 'व्हॉट मॅन हॅज मेड ऑफ मॅन?' हा होता. माझ्या मनांत आलें-मनुष्यच मनुष्याचा सत्त्यानाश करतो! छेः, मघांचा तो गृहस्थ काय म्हणाला? 'विस्तवाशीं खेळलों मी!' माणसें विस्तवासारखीं असतात कां? असतील कदाचित्! निर्मलेसारख्या फुलपांखराबरोबर आनंदानें खेळणारा मनुष्य मी! काय करायचंय् मला त्या विस्तवाशीं?

स्टोव्हचा उच्च स्वर आंत ऐकूं येत होता. कपडे काढतांच 'काय सुधी!' करीत आंत जायचें हा माझा नित्यक्रम! पण बाहेर शेंदरीवर पडलेलें पुस्तक बघतांच मला सकाळच्या कादंबरीची आठवण झाली. वाटलें राणीसरकारनीं बहुधा खालसा केलें असेल राज्य! उत्सुकतेनें मीं ती कादंबरी उचलली आणि चाळूं लागलों. निर्मलेनें नटविलेली सुधा पाहण्यांत जसा मला आनंद वाटे तसा तिनें खुणा केलेलें पुस्तक पाहूनही होई. चाळतां चाळतां पस्तिसाव्या पानावर निळ्या पेन्सिलीनें रेखांकित केलेलें एक वाक्य दिसलें—

'माणसाचें मन हें कांहीं एक रासायनिक द्रव्य तर नसेल, कीं, ज्यावर अनुभवांतील निरनिराळ्या सूक्ष्म वायूंची रासायनिक क्रिया घडावीं व ती आपल्या लक्षांत मात्र येऊं नये!'

'सिद्धांत ठोकून देण्यांत पटाईत असतात हे लेखक!' निर्मलेच्या निर्मल मनाचा विचार करीत मीं स्वतःशींच म्हटलें व पुढलीं पानें उलटलीं. पंचावन पानावर एक तांबडी खूण होती. पण तो मजकूर वाचायच्या नादाला न लागतां पुढचीं पानें चाळूं लागलों. मला आश्चर्य वाटलें—पुढें कुठेंच खूण नाहीं! म्हणजे? निर्मलेनें साऱ्या दिवसांत पंचावन पानें वाचलीं आणि तींही फडक्यांच्या कादंबरीचीं! पौर्णिमेदिवशीं चंद्र रात्रीं दहा वाजतां मावळला म्हणून कुणी सांगितलें असतें तर तेंसुद्धां एक वेळ मीं खरें मानलें असतें. पण—

पंचावन पान काढून पाहतों तों त्यांत खुणेची फीत! निर्मला या पानापुढें गेली नाहीं खास! त्या पानावर तांबड्या पेन्सिलीची नुसती खूण नव्हती. एक मोठें प्रश्नचिन्ह काढलें होतें पुढें. निर्मलेच्या मार्मिकतेचें कौतुक वाटून मी तो मजकूर वाचूं लागलों—

'आपल्या बोलण्याचालण्यांनीं तो त्यांची प्रणयोत्सुकता अधिक उत्तेजित करी हें जरी खरें असलें, तरी या साऱ्या प्रकारांत स्त्रीहृदयावर आपलें केवढें आकर्षण घडतें याचा प्रत्यय घेण्यापलीकडे श्रीचा कसलाच हेतु नसे. हा प्रत्यय

घेण्याची क्रीडा तारुण्यांतल्या प्रमत्त आनंदाचा एक भागच होय. ती ज्यांनीं कधीं केली नसेल ते अभागी होत.'

आणखी एक सिद्धांत ! मला हंसू आलें; पण इतक्यांत पंचमांत गाणारा स्टोव्ह खालच्या सुरांत गुणगुणूं लागला. आधण किटलींत जाऊन पडल्याची खूण होती ती ! मी स्वयंपाकघरांत गेलों. सुधा स्टोव्हपाशीं बसून पंप करण्याचा प्रयत्न करीत होती. तिला दूर लोटून निर्मला जरा चिडखोरपणानेंच म्हणाली 'हुळहुळतेय् सारखी पोरटी !'

'चहा करायला शिकतेय ती ! सुगृहिणी होण्याचा बेत असावा तिचा !'

'सुगृहिणी व्हायला लग्न तर झालं पाहिजे ना ?'

'न व्हायला काय झालं ? हुबेहूब आईसारखी दिसते ती ! आईचं झालंच कीं नाहीं ?'

चहा गाळीत निर्मला म्हणाली, 'पण विस्तवाशीं खेळणं बरं का ? एखादे वेळीं—'

मी एकदम दचकलों. दुपारच्या त्या गृहस्थाचे शब्द आठवले. त्याची मूर्ति डोळ्यांसमोर उभी राहिली. स्टोव्हकडे बोट दाखवीत मी सुधाला म्हटलें, 'बाऊ आहे हा हं मोठा. आपण खेळूं नये त्याच्याशीं!'

'आई कची—' लहान मुलांना उत्तरें देण्यापेक्षां त्यांचें तोंड बंद करणें सोपें असतें. बशींतलें शंकरपाळे तिच्या हातांत देऊन मीं याच मार्गाचा अवलंब केला.

चहा पितां पितां मीं निर्मलेकडे पाहिलें. किती उदास दिसत होता तिचा चेहरा !

'काय होतंय् तुला ?' मीं विचारलें.

'इश्श !'

'कांहीं तरी होतंय खास !'

'इकडून शाळेंत जाणं होतं कीं दवाखान्यांत—'

'असं थट्टेवारी नेलं म्हणून खरं लपत नाहीं कांहीं! तासाला पंचावन पानं वाचणारी तूं! पण आज त्या नव्या कादंबरीचीं—'

अंग शहारल्यासारखें करीत ती म्हणाली, 'होतंय खरं कांहीं तरी मला!'

'ताप येणार असेल!' तिनें अंग शहारल्यासारखें केलें होतें. तेवढ्यावरून मीं रोगनिदान केलें. 'स्वस्थ पड तूं जरा. सुधा खेळत बसेल मागील दारीं. मोलकरीण ठेवील तिच्यावर लक्ष.' मीं वैद्यकीय सल्ला दिला. निर्मला एरवीं सहसा अंथरुणावर पडून राहणारी नव्हती; पण ती आज चटकन् जाऊन निजली तेव्हां मला आश्चर्य वाटलें! सुधानें मागील दारीं आंब्याची एक कोय पैदा केली होती. माझ्याकडे पाहात ती म्हणाली 'यांत झयाल हुईल ना दादा?'

'होईल' म्हणून मी आंत आलों. निर्मलेचें कपाळ चेपावें व अंग ऊन झालें असल्यास थर्मामीटर लावून पहावें असा माझा इरादा होता. पण माजघरांत येतों तों दुपारचा तो गृहस्थ सोप्याच्या पायऱ्या चढत असलेला दिसला. एकदां वाटलें 'उद्यां सकाळीं ये' म्हणून सांगावें त्याला. पुन्हा विचार केला उगीच हेलपाटा कशाला द्या त्याला? खोलींत जाऊन निर्मलेच्या अंगाला हात लावून पाहिलें. कपाळ खूप तापलें होतें. पण अंग कांहीं—थर्मामिटर लावून तो पहात पहातच मी बाहेर आलों. तो गृहस्थ ती कादंबरी सहज चाळीत खुर्चीवर बसला होता. माझ्या हातांत थर्मामीटर पाहून तो म्हणाला, 'अंग तापलंय् कीं काय?'

'छेः! घरांत जरा बरं वाटत नव्हतं—'

कादंबरींत पहात पहात तो अत्यंत तिरस्कारानें हंसला. 'हा वेडा तर नसेल ना?' दुपारची शंका पुन्हा माझ्या मनांत डोकावूं लागली.

'काय झालं?' मीं खुर्चीवर बसत बसत विचारलें.

'काय लिहितात हे कादंबरीकार ! उद्यां विस्तव बर्फाहूनही थंड असतो म्हणून सांगतील.' माझ्या हातांत उघडलेली कादंबरी देत देत तो म्हणाला. मीं सहज नजर टाकली. पंचावन पान ! 'ही प्रत्यय घेण्याची क्रीडा तारुण्यांतल्या प्रमत्त आनंदाचा एक भागच होय. ती ज्यांनीं कधीं केली नसेल ते अभागी होत.' निर्मलेनें प्रश्नचिन्ह केलेलीं तींच वाक्यें !

त्याच्याकडे सहानुभूतीनें पहात मीं म्हटलें, 'तुम्हांलाच ती रिकामी जागा द्यावी असं वाटतं मला.'

'फार आभारी आहे मी आपला.'

'पण—'

इतक्यांत सुधा चिखलानें भरलेली कोय हातांत घेऊन धांवतच आली. 'अज्यून झ्याड झ्यालं नाहीं' तिनें माझ्यापुढें तक्रार मांडली. घटकाभरांत कोयीचें झाड झालें नाहीं म्हणून तिच्यावर फिर्याद करणारी बालबुद्धि ! आम्हां दोघांनाही तिचें हंसू आलें. पण तसें पाहिलें तर मोठीं माणसें आणि मुलें यांत असा मोठासा काय फरक आहे ? बालकांना घटकेंत कोयीचें झाड व्हावेंसें वाटतें; आम्हांला आमच्या आशाही तशाच—

'तुमचीच का मुलगी ही ?' त्या गृहस्थाच्या प्रश्नानें माझा विचार जागच्याजागीं थांबला. तो सुधेकडे रोंखून पहात होता. दृष्टीबिष्टीवर माझा मुळींच भरंवसा नाहीं; पण त्या गृहस्थाची ती—क्रूरच म्हणायची नाहीं तर काय ?—दृष्टि पाहून एकदम माझ्या हृदयाचा थरकांप झाला !

'तुमचीच मुलगी ही ?'

'हो, आईच्या वळणावर गेली आहे ती !' माझ्या व सुधेच्या चेहऱ्यांत कांहींच साम्य नसल्यामुळें तो विचारीत असेल असें वाटून मी म्हणालों.

तो शून्य दृष्टीनें माझ्याकडे पाहूं लागला. माझ्या मनांत आलें— 'शून्यांत परार्धें भरलीं' असें कवि सांगतात. याच्या या शून्य दृष्टींत काय असावें बरें ?

' तुमच्या पत्नींना बरं वाटत नाहीं असं मघांशीं म्हणालांत ? '

त्याची ही जाण्याची प्रस्तावना असेल असें वाटून मी म्हणालों, ' हो. '

' मी पहातों त्यांची प्रकृति हवी तर ? '

मी मोठ्या पंचायतींत पडलों.

' अजून ताजं आहे माझं ज्ञान ! पाठ म्हणून घ्या हवं तर सबंध मटीरिया ! '

मी नाइलाजानें उठलों. माझ्या मागाहून तो आंत आला. निर्मलेनें त्याला पाहिलें मात्र–मोठ्या कष्टानें ओंठाशीं आलेली भीति तिनें आंतल्या आंत दाबून धरल्याचा भास झाला मला ! त्यानें तिची नाडी हातांत घेतली, तेव्हां तर ती थरथर कांपत होती.

' डोळे पाहूं या तुमचे. ' त्यानें तिच्या पापण्या वर करीत म्हटलें.

' डोळे जळतात कां कधीं तरी ? '

' हो ! '

बाहेर येतां येतां मीं त्याला विचारलें, ' काय करावं या डोळे जळण्यावर ? '

' विस्तवापाशीं बसूं नये फारसं. अन् बसलं तरी खेळूं नये त्याच्याशीं–' त्याचा स्वर घोगरा झाला होता. मला नमस्कार करीत करीत तो म्हणाला ' बराय् ! येतों मी आतां ! '

' मग काय उद्यांपासून रुजू होतां ? '

' हो- विसरलोंच होतों तुम्हांला सांगायला. तुमच्या शाळेंतली ती जागा नकोय् मला. '

\+ \+ \+

मध्यरात्रीं कुशीवर वळतांना वाटलें–दिवा फार मोठा झालाय्. दिवसा विस्तवाच्या गोष्टी इतके वेळां झाल्या होत्या कीं, दिवा बारीक करण्याकरितां आळस झाडून मी उठलों. डोळे चांगले उघडून पाहतों

तों काय ? दिवा मोठा झाला होता खरा; पण तो निर्मलेनें केला होता. टेबलावर हातांची जुडी करून व तिच्यावर डोकें ठेवून ती बसली होती. मी हळूंच उठलों व तिच्या मागें जाऊन उभा राहिलों. तिनें कांहीं मागें वळून पाहिलें नाहीं. तिला डुलकी आली असावी.

तिच्या उजव्या हाताच्या बाजूला एक पत्र दिसत होतें. तिचेंच अक्षर ! एवढ्या अपरात्रीं उठून कुणाला पत्र लिहीत होती ही ? मी वाचूं लागलों—

आज 'निरंजन' किती आनंदानें वाचायला घेतली; पण पंचावन पानावरलें तें वाक्य— जिवाणू चावतें तेव्हां मुंगी चावल्यापेक्षां अधिक वाटत नाहीं म्हणतात; पण दोन घटका गेल्यावर पाय एवढा सुजतो कीं—

तें वाक्य तसेंच डसलें माझ्या मनाला. प्रथमतः कांहीं विशेष वाटलें नाहीं; पण दोन घटकांत डोकें कसें गिरगिरायला लागलें. किती रडलें, किती कढलें; पण रक्ताचे डाग अश्रूंनीं पुसून जात नाहींत असें कुठेंसें वाचलें आहे तेंच खरें !

'आई, ललतेस कां ?' म्हणून सुधा विचारूं लागली. तीन वर्षांच्या सुधे, काय सांगूं तुला ? तूं सतरा—अठरा वर्षांची होशील, नाटकें—कादंबऱ्या वाचून प्रेम हा खेळ आहे अशी आपली कल्पना करून घेशील, आणि हा खेळ खेळण्याला निवांत वेळ तुला मिळेल, तरच आज मी कां रडत होतें तें तुला कळेल. पण नको ! माझ्या बाईला तें जन्मांत कळूं दे नको. प्रेम हा खेळ नाहीं. भयंकर शिकार आहे ती ! प्रेम हें फूल नाहीं. तो विस्तव आहे.

मी निर्मलेकडे पाहिलें. रडून रडून दमलेलें मूल जसें झोंपी जातें, तशी ती दिसत होती. मला तिच्या लग्नाच्या वेळचा इतिहास आठवला. मुंबईतल्या चाळींत तिचे वडील राहत असत. मुलींना मॅट्रिकपर्यंतचें

शिक्षण वस्स आहे असें त्यांचें मत ! त्यामुळें मॅट्रिक झाल्यापासून लग्न होईपर्यंत एकदीड वर्ष ती घरीं स्वस्थच होती. या अवधींत तिनें इतक्या कथाकादंबऱ्या वाचल्या होत्या कीं, बोलून सोय नाहीं. मी तिला पहायला गेलों तेव्हां तिचे वडील थट्टेनें म्हणालेही होते–' आमच्या निमाताईला दोन दागिने कमी असले तरी चालतील; पण एक भरपूर हवं !'

' काय ? ' मी विचारलें होतें.

' कादंबऱ्या ! '

' गांवांतल्या लायब्ररीचा ऑनररी सेक्रेटरी होईन म्हणजे झालं ! ' मी उत्तर दिलें होतें.

सतरा अठरा वर्षांचें मुग्ध वय–मुबलक वेळ–शृंगारिक कथा कादंबऱ्यांचीं पारायणें–चाळींतलें आयुष्य–गोंधळलेल्या मनानें मी तिच्या लिखाणाचा पुढील भाग वाचूं लागलों–

चाळींत आमच्या पलीकडे राहणारा बिचारा आनंद ! घरचा गरीब ! पण हुषारीमुळें मेडिकल कोर्स घेतला होता त्यानें ! कोणत्या कुमुहूर्तावर त्याच्याशीं प्रेमाचा खेळ खेळण्याची इच्छा झाली मला ! फडक्यांनीं लिहिलें आहे. ' ही क्रीडा ज्यांनीं कधीं केली नसेल ते अभागी होत. ' मी म्हणतें ज्यांनीं केली असेल तेच अधिक अभागी. शेजारच्या वात्रट शांतेचें ऐकून मी आनंदाच्या येण्या-जाण्याच्या वाटेवर उभी राहूं लागलें ! पहिल्यापहिल्यांदा तो डोळा वर करून पाहत सुद्धां नसे माझ्याकडे. पुढें–पण तो माझाच अपराध ! ' तुमच्या पुस्तकांत सारीं घाणेरडीं औषधं असायचीं ! फुलं कुठून असणार ?' असें पुनःपुन्हा मी त्याला म्हटलें. मग एके दिवशीं त्यानें मला हळूंच फुलें आणून दिलीं तर त्यांत त्याचा काय दोष ? बरोबरं फिरायला जाऊन, हंसून, खेळून आणि शेवटीं शांतेच्या शिकवणीवरून पत्रें लिहून मी

त्याच्याशीं खेळत होतें. पण जीव घेण्याचा खेळ तो! शिकार हा माणसाचा खेळ होतो; पण हरिणें आणि ससे यांना—

आज संध्याकाळीं एकदम आंत येऊन त्यानें मला तपासलें! अशी धडधडत होती माझी छाती तेव्हां! त्याच्याकडे मीं पाहिलें मात्र—वीज पडून जळून गेलेल्या माडासारखा वाटला तो मला! तें हंसणें, ते सतेज डोळे, सारें कुठें गेलें? कुठें गेलें? मी चांडाळणीनें जाळलें. त्याच्याविषयीं कांहीं वाटत नसतांना मी त्याच्याशीं प्रेमाचा खेळ खेळलें. तरुणाच्या हृदयावर आपलें आकर्षण चालतें कीं नाहीं याचा अनुकूल अनुभव मीं घेतला. माझें प्रेमाचें नाटक यशस्वी झालें; पण त्याचा जीव मात्र खुराखुरा गेला.

छे, जीव गेलाच म्हणायचा! एवढा हुषार मुलगा! पण माझें लग्न ठरल्याचें ऐकतांच तो कुठल्याकुठें नापत्ता झाला. त्याचे म्हातारे वडील चौकशी करण्याकरितां आले तेव्हां त्यांच्याकडे पाहण्याचासुद्धां मला धीर होईना! आज डॉक्टर होऊन महिना दोनचारशें रुपये मिळवायचे त्यानें! पण पंचवीस रुपयांच्या मास्तरकीकरितां पदर पसरून आज तो इथें आला. ती जागासुद्धां त्याला पचूं दिली नाहीं मीं! त्याची हकीगत सांगतांना तिकडून म्हणणं झालं 'वेडा दिसतोय् तो!' पण मीच नाहीं का त्याला वेडं लावलं? त्याच्या शेवटच्या पत्रांतल्या त्या चारच ओळी—'

इथेंच निर्मलेचें लिहिणें संपलें होतें. कुतूहलानें मीं पलीकडेच पडलेला एक नोटपेपर उचलला. त्यावर सुंदर अक्षरांत लिहिलें होतें—

'प्रिय × ×

तुझीं पत्रें परत करीत आहे. तीं ठेवून पुढें तुझ्या नवऱ्याला दाखवायला मी कांहीं नाटकें कादंबऱ्यांतला दुष्ट

मनुष्य नाहीं. एक गोष्ट मात्र विसरूं नकोस; नाहींतर पुढें पस्तावशील—

'चाकू-कात्रीं हीं लहान मुलांचीं खेळणीं नव्हेत हें खरें ना! दुसऱ्यांचीं हृदयें हींसुद्धां तरुण-तरुणींचीं खेळणीं नव्हेत.'

त्या कागदावर माझ्या डोळ्यांतून टपटप अश्रू पडूं लागले. जाग्या झालेल्या निर्मलेनें विचारलें, 'काय हें?'

'विस्तव विझिवतोय् पेटलेला!'

'विझवला तरी काय? राखच पदरांत पडायची! तो फुंकून पेटवायलाच नको होता!' तिनें सद्गदित स्वरांत उत्तर दिलें.

# पाषाणाचे अश्रु !

काळ्याकुट्ट ढगांनीं आभाळ भरून गेलें. सूर्य अगदीं दिसेनासा झाला. ' काय हा भयंकर संहार ! ' असें म्हणून आकाशानें जणुं काय आपले डोळेच मिटून घेतले.

टप-टप-टप पावसाचे थेंब पडूं लागले. राजकवींना स्फूर्ति झाली— ' महाराज, आकाशाच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. '

समोर पसरलेल्या प्रेतांच्या राशींकडे उन्मादानें पाहत राजा पाषाणवर्मा उद्गारला, ' बौद्धधर्माची दीक्षा घेतलेली दिसते त्यानं. '

दिग्विजयी राजाची कोटि ! जणु कांहीं देवमाशाच्या प्रचंड शेंपटाचा तडाखाच ! सभोंवतालच्या सरदारांत हास्यरसाच्या प्रचंड लाटा उसळूं लागल्या.

मेघांच्या गंभीर गडगडाटाला हळुहळु सुरवात झाली.

राजकवींनाही स्फुरण चढलें. ते म्हणाले, ' मेघ कसले ? कृष्ण-सिंहच आहेत हे ! पहा कसे गुरगुरूं लागले ! '

रणांगणावर पडलेल्या जखमी माणसांच्या कण्हण्याचा संमिश्र करुणध्वनि दुरून ऐकूं येत होता. तो ध्वनि ऐकत राजा म्हणाला, ' चुकतांहां तुम्ही कविराज ! कुठले कृष्णसिंह अन् कुठलं काय ? आकाश ' नमो बुद्धाय, नमो बुद्धाय ' म्हणत आहे. '

राजाच्या आवडत्या गोष्टी तीन होत्या—लढाई, बुद्धाची निंदा व नर्तिका. हातांतील खड्गाच्या खणखणाटाइतकाच नर्तिकेच्या पायांतील नूपुरांचा मंजुळ नाद त्याला प्रिय होता. शत्रूशीं लढणारे त्याचे बाहु, बुद्धाची निंदा करणारी त्याची जीभ आणि नर्तिकेचा नाच पहाणारे त्याचे डोळे—त्या त्या वेळीं प्रत्येकांत जणूं कांहीं त्याचे पंचप्राणच उतरत असत.

लढाईची आवड आणि नृत्याची आवड! कुठें मृत्यूचा विक्राळ जबडा आणि कुठें कलेचें हास्यवदन! पण या विरोधाचेंही पाषाणवर्मा मोठ्या गमतीनं समर्थन करी. तो म्हणे, ‘प्रलयकाळीं रुद्र तांडवनृत्य करतो. हें नृत्य कांहीं स्मशानांत शिकला नाहीं तो! आणि भूतगणाला गुरूही केलं नाहीं त्यानं! हें सारं त्याला पार्वतीनं शिकवलन्. भिल्लीण होऊन आपल्या मोहक नृत्यानं तिनं त्याला वेडावून सोडलं नव्हतं का?’

आकाशांत वीज चमकूं लागली. राजाला खूप करण्याकरितां राजकवि म्हणाला, ‘महाराज, आकाश ऊर पिटून घ्यायला लागलं! बौद्धधर्म! बौद्धधर्म!’

पण वीज पाहतांच राजाची निद्रित वासना जागृत झाली. तो उद्गारला, ‘वाहवा! मेघांच्या तालावर वीज नाचायला लागली. बस्स्! चला शिबिरांत. एक सुंदर नर्तिका आणा–’

सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. सारें नगर भीतीनें व्याकुळ होऊन गेलेलें! समोर प्रेतांचा खच पडलेला! अशा वेळीं नगराबाहेरच्या शिबिरांत नर्तिका आणायची कुठून?

कुणालाशी आठवण झाली–

दुपारीं नगर लुटतांना सैनिकांनीं कांहीं स्त्रिया बंदिवान करून आणल्या होत्या. महाराजांची आज्ञा अंमलांत आणण्याकरितां सरदार निघून गेले.

‘काय कविराज, जायचं ना शिबिराकडे?’ राजानें विचारलें.

कवि व्याकुळ दृष्टीनें रणक्षेत्राकडे पहात होता.

‘काय पाहताहां कविराज?’

‘कांहीं नाहीं. माझा एक मित्र लढाईत पडला. त्याच्या मृत देहाचं दर्शन घ्यावं–’

‘तुमच्यांतही बुद्धाचा अवतार झाला वाटतं? अहो, मेला तो गेला! माझ्यासारख्या दिग्विजयी राजाचा कवि आणि तो इतक्या दुबळ्या मनाचा!’

थोडें पुढें जाऊन राजा म्हणाला,

'हः, हें संगीत ऐकलंत का ?'

कवीच्या अंगावर शहारे उभे राहिले. कण्हणें, विव्हळणें, 'पाणी पाणी' म्हणून आक्रोश–सर्वच किती भेसूर !

नकळत त्याच्या डोळयांत पाणी उभें राहिलें.

राजाच्या तें लक्षांत आलें. तो तीक्ष्ण स्वरानें म्हणाला, 'कविराज, रडताहां तुम्ही ? [अश्रू हे दुबळयांच्या डोळयांचं वैभव]'

याच वेळीं वीज लख्कन् चमकली. जणुं कांहीं त्या दिग्विजयी राजाच्या डोळयांवर आणि हृदयावर तिनें प्रकाशच पाडला. डोळे कसले ते ! संगमरवरच !

तें पाहून कवीला वाटलें 'पाषाणाला कधीं पाझर फुटला आहे का ?'

मित्राचें शव न शोधतां कवि राजाबरोबर शिबिराकडे गेला.

\+ \+ \+

बंदिवान स्त्रियांत एक सुंदर व नृत्यकुशल वेश्या होती.

'माझ्या नृत्याचं मोल ?' तिनें सरदारांना प्रश्न केला.

सुवर्णाच्या नाण्यांचे आंकडे भराभर वाढले; पण पुष्पा कबूल होईना.

कंटाळून सरदार म्हणाले, 'तूंच सांग काय तें मोल !'

'माझं स्वातंत्र्य ! नृत्य संपतांच मी वाटेल तिथं जाईन.'

नृत्याचें हें मोल सर्वांनाच विलक्षण वाटलें.

दिग्विजयी राजाची कृपादृष्टि सोडून ही वेश्या दुसरीकडे जाणार ! वेडी तर नाहीं ना ही ?

हां हां म्हणतां शिबिरांत नृत्यसमारंभाची तयारी झाली. पुष्पाच्या कंठांत कोकिळेची माधुरी होती, तसा तिच्या अभिनयांत कबुतराचा डौल-

दारपणाही होता. क्षणोक्षणीं तिची देहलता गालिचावर मुरडत होती. जणुं कांहीं तारकांकित आकाशांत क्षणांत इथें तर क्षणांत तिथें चमकणारी विद्युल्लताच ! मंद वायुलहरीनें हालणाऱ्या लतिकेप्रमाणें तिचा सूचक अभिनय राजाला मनोहर वाटला. तिच्या प्रत्येक हालचालीबरोबर प्रेक्षकांवर सुगंधी पुष्पांचा वर्षावच होत होता. पाषाणवर्मा अगदीं मुग्ध होऊन गेला.

पुष्पेनें त्या दिवशीं आपल्या कौशल्याची कमाल केली. तिच्या मधुर आलापांतून चांदण्याची बरसात वर्षत होती; मग तिचें मोहक नृत्य या चांदण्यांत बसून सरस्वतीनें केलेल्या वीणावादनासारखें भासावें यांत नवल तें कसलें ?

तिच्या गीतांतील अर्थाकडे मात्र कुणाचें लक्ष गेलें नाहीं. तिच्या एका गीतांत मध्यरात्रीं अंथरुणावर तळमळत पडलेल्या राजपुत्राच्या हृदयाची तडफड व्यक्त केली होती. तो राजपुत्र बुद्धच असावा बहुधा ! त्याचें हृदय म्हणत होतें.

मी इथें मंचकावर पडलों आहें. पण बाहेर ?—

बाहेर अनाथ—अपंग ओल्या जमिनीवर हातापायांची जुडी करून पडले आहेत.

भूक नसल्यामुळें ताटांतलीं पक्वान्नें उष्टावून मी मधांशीं उठलों. पण बाहेर ?——

बाहेर शिळ्या भाकरीचे जमिनीवर पडलेले तुकडे खाऊनही भूक न भागल्यामुळें गरिबांचीं बाळें रडत रडत झोंपीं गेलीं आहेत.

मंचकावर निजलेल्या माझ्या पत्नीच्या अंगावरील रत्नें दीपप्रकाशांत चमचम करीत आहेत. पण बाहेर ?—

बाहेर असंख्य माता, भगिनी, पत्नी आणि कन्या या वेळीं तळमळत असतील. गालांवर ओघळलेलें अश्रू हेच त्यांचे अलंकार.

मला झोंप येत नाहीं. केव्हां एकदां पहांट होईल असें वाटत आहे. रम्य उषःकाल केव्हां होईल ? पण बाहेर ?—

बाहेरच्या गोरगरिबांना, दीन-दुबळ्यांना आणि अनाथ-अपंगांना असेंच वाटत असेल का ? छेः, उषःकाल हा मला लग्नांतला लाजाहोम वाटतो. पण त्यांना ?—वध्य पशूला यज्ञांतला होम कधींतरी आवडेल का ? उषःकाल म्हणजे एक कठिण नवा दिवस ! तो उगवण्यापेक्षां या रात्रीचेंच काळरात्रींत रूपांतर व्हावें असें त्यांना वाटत असेल. '

हिमालयांत वृक्षांच्या सांवलींत फिरणाऱ्या माणसाला मध्यान्हींचे सूर्यकिरण चंद्रकिरणांसारखे वाटतात. पुष्पाच्या गानमाधुर्यामुळें गीतांतील प्रखर विचार कुणालाच जाणवले नाहींत.

गाणें संपलें. नृत्यही संपत आलें. नर्तिकेच्या चरणांतील नूपुरांतून ' नमो बुद्धाय, नमो बुद्धाय ' असे ध्वनि स्पष्ट ऐकूं येऊं लागले. सरदारांना वाटलें, ही शत्रुपक्षाकडील वेश्या महाराजांची उघड उघड कुचेष्टा करीत आहे ! त्यांच्यापैकीं एक दोन तरवारीला हात घालीत एकदम उठलेही. पण नृत्यांत तल्लीन झालेल्या राजाकडे पाहतांच त्यांना पुष्पेला दटावण्याचा धीर झाला नाहीं.

नृत्य आटोपलें. पानसुपारीच्या वेळीं पुष्पा अत्तर लावून घ्यायला तयार होईना. राजाला आश्चर्य वाटलें.

वेश्येला सुगंधाचा तिटकारा ! त्यानें विचारलें, ' नर्तिके, तुला सुगंध आवडत नाहीं ? '

' आवडतो महाराज ! पण मला फूल द्या. त्याला वास नसला तरी मी त्याचा आनंदानं स्वीकार करीन. '

रणांगणावर फूल कुठून मिळणार ? वेश्या जणुं कांहीं राजाच्या सत्त्वाची परीक्षाच पाहत होती.

राजानें हंसत प्रश्न केला, ' नर्तिके, अत्तर फुलांपासूनच करतात. '

' होय महाराज, पण अत्तर म्हणजे फुलांचं रक्त ! मला सजीव सुगंध हवा ! दुसऱ्याचा जीव घेऊन मिळणारा आनंद माझ्यासारख्या नर्तिकेला कुठून कळणार ? '

राजाचे डोळे मंगळाप्रमाणें चमकले. आतां नर्तिकेच्या शिरच्छेदाची आज्ञा होणार असेंच सर्वांना वाटलें. राजा तिच्या मुखाकडे टक लावून पहात होता. क्षणांत मंगळाचें शुक्रांत रूपांतर झालें.

नर्तिका निघून गेली. राजा मंचकावर पडला. उद्यांच्या युद्धाचा विचार तो करूं लागला. पदोपदीं त्याच्या विचारांची सांखळी तुटत होती. असें कां व्हावें? तो उठून दारांत आला. पलीकडच्या टेकडीआडून चंद्र नुकताच वर येत होता. बाहेर अंधाराला उजाळा मिळत होता. पण राजाच्या मनांत?—उद्यांच्या लढाईपेक्षां मघांची नर्तिकाच त्याच्या मनोमंदिरांत नाचूं लागली होती.

त्यानें नर्तिकेला बोलावणें पाठविलें. पण ती होती कुठं? शिबिराबाहेर पडतांच कुणाशीं एक शब्दही न बोलतां ती निघून गेली होती.

पाषाणवर्मा शय्येवर सारखा तळमळत होता. दररोज रात्रीं विजयलक्ष्मी मधुर गीतें म्हणत असतांना तो झोंपीं जाई; पण आज ती मुकी झाली होती. मुकी? छेः! त्याला वाटे त्या नर्तिकेची दासी होऊन ती आपल्या शिबिरांतून निघून गेली असावी! या कुशीवरून त्या कुशीवर वळतांना उशाशीं ठेवलेल्या खड्गाला त्याचा सहज हात लागला. खणूकन् त्याचा आवाज झाला. तो त्याला अगदीं कर्कश वाटला; आणि त्याच क्षणीं नर्तिकेनें नृत्य संपवितांना नूपुरांतून काढलेले बोल त्याच्या कानांत घुमूं लागले. ‘नमो बुद्धाय’, ‘नमो बुद्धाय’.

फार उकाडा होउं लागला कीं पाऊस पडतो. आतां आपल्या डोळ्यांत अश्रु उभे राहतात कीं काय, अशी भीति राजाला वाटूं लागली. लगेच स्वतःचे संध्याकाळचे उद्गार त्याला आठवले. ‘अश्रू हें दुबळ्यांच्या डोळ्यांचं वैभव!’ नृत्यानं नाजुक झालेल्या मनाला पुन्हां कठोर केलं पाहिजे! बस्स! एकच मार्ग! आतांच्या आतां, ऐन मध्यरात्रीं रणांगणावर जायचं. त्या प्रेतांच्या राशींत नर्तिकेची सुंदर मूर्ति पुरून टाकायची. कोल्हीं प्रेतें फाडीत असतांना होणारा तो भेसूर आवाज—तो कानांत शिरला कीं नूपुरांचा मंजुळ ध्वनि आपोआप ऐकूं येईनासा होईल.

पाषाणवर्मा शिबिराबाहेर एकटाच पडला. चांदण्याऐवजीं झाडांखालच्या अंधाराकडे पाहत तो रणांगणाजवळ आला. त्याची चाहूल लागतांच एक कोल्हा सरकन् इकडून तिकडे पळत गेला. आपल्या मनांतील दुबळे विचार असेच पळून जात आहेत असा त्याला भास झाला.

खोल विहिरींतून यावा तसा एक आवाज ऐकूं आला.

'पाणी, पाणी–'

कठोर होऊं लागलेलें राजाचें मन म्हणालें, 'दिग्विजयी राजापाशीं फक्त तरवारीचं पाणी असतं !'

आवाज ऐकूं आला, त्या बाजूला राजानें पाहिलें.

एक मनुष्याकृति लगबगीनें तिकडे जात होती. राजाला वाटलें– कुणी भूतपिशाच्च तर नसेल ना ? तो थोडासा पुढें गेला.

कुणीतरी स्त्री ! तिच्या घाईच्या चालींतहि किती तालबद्धता होती ! लढाईंत पडलेल्या आपल्या वल्लभाला शोधण्याकरितां ती बहुधा नगरांतून आली असावी !

राजाचें कुतूहल त्याला स्वस्थ बसूं देईना. हलक्या पावलांनीं तो त्या स्त्रीच्या पाठोपाठ जाऊं लागला. त्यानें निरखून पाहिलें. हातांत काय बरं असावं तिच्या ? वल्लभानें दिलेली एखादी प्रेमाची भेट ?

'पाणी, पाणी' असा आवाज जिथून येत होता तिथें ती स्त्री थांबली. तिनें वांकून पाहिलें; क्षणभरानें मान वर केली; पदरानें डोळे पुसले. ती खालीं बसली आणि उजव्या हातातील भांड्यांतून थोडें पाणी घेऊन तें घोट घोटभर त्या तहानेनें व्याकुळ झालेल्या मनुष्याला पाजूं लागली. त्या स्त्रीचा चेहरा पाहण्याचा मोह राजाला अनिवार झाला. तो झट्कन् पुढें आला. त्या स्त्रीनें दचकून वर पाहिलें. पुष्पा ! पाषाणवर्म्याकडे दृष्टि जातांच तोंड फिरवीत ती उद्गारली– 'हुंः ! लांडगा !'

तिच्या उद्गारानें राजाला राग आला. पण त्या जखमी माणसाकडे बोट दाखवीत त्यानें विचारलें, 'हा कोण तुझा ?'

‘ माझा ? भाऊ. ’

‘ भाऊ ? ’

‘ हो ! तुम्हीदेखील भाऊच आहां माझे. एकाच ईश्वरानं आपणांला-सारेच भाऊ कुठं सारखे असतात पण ? ’–

राजा स्तंभित झाला. पण मघांचा ‘ लांडगा ’ शब्द त्याच्या हृदयांत शल्याप्रमाणें सलत होता. तो म्हणाला, ‘ तुझ्यासारख्या वेश्येनं या वेळीं रंगमहालांत असायचं. इथं या नरकांत —’

पुष्पा हंसत उद्गारली, ‘ हा नरक ? कुणीं निर्माण केला हा नरक ? ’

तिचा प्रश्न राजाच्या हृदयाला खड्गाच्या घावासारखा भासला. पण या वाग्युद्धांत शत्रूचा पराभव करणें सोपें काम नाहीं हें त्यानें ओळखलें.

तो मृदु स्वरानें म्हणाला, ‘ नर्तिके, रमणाला मदिरेचे पेले भरून द्यायच्या या वेळीं–’

व्याकुळ जीव शांत झाल्यामुळें कृतज्ञ दृष्टीनें पाहणाऱ्या समोरील जखमी मनुष्याकडे बोट दाखवीत पुष्पेनें उत्तर दिलें, ‘ ह्या क्षणीं हाच माझा रमण आहे. ’ हातांतील पाण्याचें भांडें वर धरून ती म्हणाली, ‘ आणि ही पाहिलीत का मदिरा ? ’

लाथेच्या एका ठोकरीनें तिच्या हातांतील भांडें उडवून टाकावें असा विचार राजाच्या मनांत डोकावून गेला. पण तो क्षणभरच. पुष्पेला खिजविण्याकरितां तो म्हणाला, ‘ नर्तिके, कुठं रंगमहालांतल्या पुष्पमालांचा सुवास आणि कुठं ही प्रेतांची दुर्गंधि ! ’

रणांगणावर पसरलेल्या प्रेतांच्या राशींकडे पाहात पुष्पेनें विचारलें, ‘ महाराज, हीं प्रेतंसुद्धां फुलंच आहेत. धरणीमातेचीं हीं फुलं-त्यांचा चोळामोळा करणाऱ्या राक्षसाला आपण शिक्षा कराल का ? ’

चंद्रावर अभ्रें आलीं. राजाच्या चेहऱ्यावर विलक्षण विचारांच्या छाया दिसूं लागल्या. क्षणार्धांत चंद्र हंसला. राजानें पुष्पेजवळ येऊन प्रश्न केला, ‘ नर्तिके, तूं माझी पट्टराणी होशील ? ’

पुष्पा निरुत्तर झाली असें राजाला वाटलें. दिग्विजयापेक्षांही रमणीच्या मनावर विजय मिळविणें अधिक कठिण ! राजानें अभिमानानें विचारलें, ‘ काय ठरला तुझा विचार ? ’

पुष्पेच्या डोळ्यांपुढें या मध्यरात्रीऐवजीं दुसरी मध्यरात्र नाचत होती. रणांगणाचा रंगमहाल झाला, तारकांचें अत्तराच्या दिव्यांत रूपांतर झालें आणि समोर सम्राट् पाषाणवर्म्याच्या जागीं भगवीं वस्त्रें धारण करणारा सुंदर तरुण बुद्धभिक्षु तिला दिसूं लागला. ऐन मध्यरात्रीं कपटानें—मरणोन्मुख मनुष्याला धीर देण्याकरितां म्हणून आपण त्याला आपल्या महालांत आणलें होतें. विश्रांतीकरितां मंचकावर बसून उपदेश घेण्याच्या मिषानें आपण त्याचे पाय धरले. आपलें तें लावण्य—ती वेशभूषा—उन्हाळ्यांत हिमालयाला पाझर फुटल्याशिवाय थोडेच राहातात ! भिक्षु आपल्याकडे टक लावून पाहूं लागला. तो थोडासा वांकला देखील. इतक्यांत——

पलीकडच्या खोलींतून आपल्या दमेकरी आईचें कण्हणें ऐकूं आलें. ‘ माझा मित्र तिकडे आहे वाटतं ? ’ असें म्हणत तो तिकडे निघून गेला. तिला हलकें वाटेल अशा रीतीनें आपल्या शरिराचा आधार देऊन तो तिच्याजवळ रात्रभर बसला.

दुसरें दिवशीं सकाळीं तो निघून गेला. पण आपल्या मनोमंदिरांतून ? छे— आज तीन वर्षें झालीं. पुष्पेचें मौन राजाला संमतिदर्शक वाटलें. त्यानें विजयी स्वरानें विचारलें, ‘ मग होणार ना तूं माझी पट्टराणी ? ’

पुष्पा हंसत हंसत म्हणाली, ‘ एका अटीवर—— ’

‘ सम्राटाला अटींची कसली पर्वा ? ’

‘ साधी अट आहे माझी— ’

‘ साधी असो नाहींतर— एवढं सैन्य आहे माझ्या पाठीशीं ! ’

‘ पण हृदयांत काय आहे ? ’

राजा बावरला. त्यानें व्याकुळ स्वरानें विचारलें, ‘ काय अट आहे तुझी ? ’

‘संन्यास घ्या आपण, अन् मग—’

दुसरीकडून ‘पाणी,’ ‘पाणी’ असा आवाज झाला. ‘नमो बुद्धाय’ म्हणत पुष्पा त्या बाजूला निघून गेली.

× × ×

कवि मृतमित्राचा शोध करण्याकरितां पहांटे रणांगणावर आला. एकदम करुण स्फुंदन त्याच्या कानांवर पडलें. जखमी मनुष्याचं कण्हणं ? छेः, कुणीतरी अगदीं स्फुंदस्फुंदुन रडत होतें. कवि कळवळून तिकडे गेला. त्यानें सदय स्वरानें विचारलें, ‘कोण रे बाबा तूं ? काय झालं तुला ?’

रडणाऱ्या व्यक्तीनें मान वर करतांच चंद्राच्या फिक्कट प्रकाशांत कवीनें पाहिलें—महाराज पाषाणवर्मा !

(१९३३)

———

# हिरा तो भंगला

जयवंताचें लक्ष पायांखालच्या वाटेकडे नसून हातांतल्या पत्राकडे होतें. पेडण्यापासून देवसापर्यंतचा रस्ता नारळीपोफळींच्या बनांनीं इतका आच्छादित झालेला आहे कीं दुपारीं बारा वाजतां त्या मार्गानें जाणाऱ्या प्रवाशाला आपण पहांटेच प्रवास करीत आहोंत असा भास झाल्यावांचून रहात नाहीं. सगळया जगाच्या डोक्यावर बसून करडा अंमल गाज-विणाऱ्या मध्यान्हींच्या सूर्यालाही आपल्या उंच हातांनीं दूर लोटणारे कोंकणभूमीचे ते शूर शिपाई पहाण्यांत प्रत्येक प्रवासी दंग होऊन जातो. चिंताग्रस्त जीवाला पडणाऱ्या सुखस्वप्ना-प्रमाणें, द्रव्यैकदृष्टि जगांत आढळून येणाऱ्या प्रेमळ मित्राप्रमाणें, सगळें जग रखरखीत उन्हानें भाजून जात असतांना मध्येंच अत्यंत शीतल राहिलेला व हिरवागार दिसणारा भूमिभाग कुणाच्या अंतःकरणाला आनंद देणार नाहीं ? सकाळीं गवतावर दिसणाऱ्या दंवाच्या जाळयां-प्रमाणें सूर्यकिरणांचीं अस्पष्ट जाळीं मधून मधून दृग्गोचर होत होतीं. पण जयवंताला तीं दिसत नव्हतीं. पत्र एकदां वाचून पुरें झालें कीं तो सभोंवतालीं हंसऱ्या मुद्रेनें पाही व पुनः पत्र वाचण्याकरतां मान खालीं घाली. तो हें पत्र कितव्यांदा वाचीत होता हें प्रत्यक्ष चित्रगुप्तालादेखील नक्की सांगतां आलें नसतें. आपल्या लाडक्या मुलाचे कितीही मुके घेतले तरी आईची जशी तृप्ति होत नाहीं, त्याप्रमाणें तें पत्र जयवंतानें अनेकदां वाचलें असूनही त्याचें अजून समाधान झालें नव्हतें. प्रियकरणीवर कविता करण्यांतच घरांतली सगळी शाई खर्च करणाऱ्या एकाद्या कवीनें जर त्याला या वेळीं पाहिलें असतें तर तें त्याच्या भावी प्रियेचें पहिलें अगर भूत प्रियेचें शेवटचें पत्र असावें असा त्यानें खास तर्क केला असता ! एखाद्या बेकार तरुणाला जर पत्रांत गढून गेलेला जयवंत दिसला असता तर

त्याच्या हातांतील पत्र दुसरें तिसरें कांहीं नसून तें नोकरीच्या अर्जाला साहेबांकडून आलेले होकारार्थी उत्तर आहे असें त्यानें छातीवर हात ठेवून सांगितलें असतें. त्या पत्राचीं पारायणें करतांना तो जर एखाद्या व्यापाऱ्याच्या दृष्टीला पडला असता तर त्याच्या हातांतील चिटोऱ्यांत आण्याच्या दरानें घेतलेल्या मालाची किंमत रुपया झाल्याचा मजकूर असलाच पाहिजे अशी त्यानें खास ग्वाही दिली असती.

पण वेड्या जयवंतानें या प्रतिभासंपन्न कवींचा, बेकार विद्वानांचा व व्यवहारचतुर व्यापाऱ्यांचा कयास सर्वस्वीं खोटा ठरविला असता. त्याच्या हातांतील पत्र दुसरें कसलेंही नसून त्याच्या बहिणीचें होतें. पत्र लहानच असलें तरी त्यांतल्या प्रत्येक अक्षरांत तिचें अंतःकरण पूर्णपणें उतरलें होतें. हृदय पिळवटून आल्यामुळें वहाणाऱ्या रक्तांत निश्चयाची लेखणी बुडवून त्यांतला प्रत्येक शब्द तिनें लिहिला होता. जयवंतानें इकडे तिकडे पाहिलें. रस्त्यावर चिटपांखरूं देखील नव्हतें. त्या पत्रांतील हृदयभेदक भाग तो मोठ्यानें वाचूं लागला. “ दादा, तुला आपली बहीण जगावी असें वाटत असेल तर माघी पौर्णिमेच्या मध्यरात्रीपर्यंत मावशीच्या सावकारापुढें पांचशें रुपये मोजलेच्च पाहिजेत. मावशीचें म्हणणें मी या सावकारापाशीं त्याची राख म्हणून राहावें असें आहे. तो मोटारींतून तुला फिरायला नेईल, मागशील ते दागिने अंगावर घालील, पायांत कांटा रुतला तर लगेच वेंगुर्ल्याच्या बाप्याला घेऊन येईल, एक ना दोन छप्पन्न गोष्टी ती मला सांगत असते. हा सावकार आज मला फुलाप्रमाणें झेलील; पण उद्यां निर्माल्य म्हणून फेंकून देईल. दादा, तुझा उपदेश मी मुळींच विसरलें नाहीं. पापाच्या चिखलांत मिसळलेलें वैभवाचें अत्तर कुणीही अंगाला लावणार नाहीं हें तूं मावशीला रागारागानें दिलेलें उत्तर माझ्या कानांत अजून घुमत आहे. वेश्या होऊन तूपपोळी खाण्यापेक्षां पत्नी होऊन मीठभाकरी खाणें अधिक बरें हें तुझ्या पत्रांतलें वाक्य मी सारखें जपीत आहे. माघी पौर्णिमेच्या मध्यरात्रीपर्यंत तूं पांचशें रुपये घेऊन आलास तर तुझी हिरा तुला पवित्र व जिवंत आढळेल.

रात्रीचे बारा वाजून गेल्यावर मी माझी मालक नाहीं. मावशी मला अनीतीच्या खड्ड्यांत टाकायला टपून बसली आहे. त्या खड्ड्यापेक्षां एखादी विहीर जवळ केलेली काय वाईट ?"

जयवंतानें पत्रावरली नजर काढून भोंवतालीं पाहिलें. नारळी व पोफळी समाधिस्थ साधुपुरुषांप्रमाणें दिसत होत्या. उजवीकडून येणारा वारा नदींत स्नान करून आल्यामुळें थंडगार वाटत होता. झाडीआड असलेल्या एका खोंपटाजवळ कोंबडा 'कू कू' करून आरवत होता. आपली गरिबी, गरिबीच्यापायीं बहिणीला वश्या होण्याची आलेली पाळी, व्यसनी व व्यभिचारी सावकारापेक्षां मृत्यूच्या गळयाला मिठी मारण्याची झालेली तिच्या मनाची तयारी, या सर्व गोष्टी डोळयांपुढें उभ्या राहून हे माड, हा वारा, तो कोंबडा आपणांपेक्षां किती तरी सुखी आहेत असें जयवंताला वाटलें. पण तें क्षणभरच ! दुसऱ्याच क्षणीं, माणसें दारू काढूं लागलीं तर माडाला त्यांचा प्रतिकार करतां येत नाहीं, उन्हाळयांत सूर्यानें भाजून काढलें तरी वाऱ्याला हूं कीं चूं म्हणतां येत नाहीं आणि कुठल्या तरी काल्पनिक देवचाराला प्रसन्न करण्यासाठीं धनी कोंबडयाची मान मुरगळूं लागला म्हणजे त्याला मरण्याखेरीज गत्यंतर उरत नाहीं या गोष्टी त्याला आठवल्या. सुखी दिसणाऱ्या जड सृष्टीपेक्षां दुःखी वाटणारी मानवी सृष्टीच बरी असें त्याला वाटूं लागलें.

त्यानें कोटाच्या डाव्या बाजूच्या आंतल्या खिशांतून एक लहानसें पुडकें काढलें व एक दोन म्हणून त्यांतील कागद मोजावयाला सुरुवात केली. पन्नास हा आंकडा उच्चारून तें पुडकें पुन्हां व्यवस्थित रीतीनें खिशांत ठेवतांना त्याचा चेहरा आवाक्याबाहेरलें एखादें काम पार पाडणाऱ्या मनुष्याप्रमाणें विजयोत्साहानें भरून गेला होता. दहादहाच्या त्या पन्नास नोटा, ते पांचशें रुपये, जयवंतानें पोटाला चिमटा घेऊन शिल्लक टाकले होते. हिराकरितां जर त्याचा जीव तिळतिळ तुटला नसता तर पै पै वांचवून पांचशेंची पुंजी त्याला करतांच आली नसती. पण तिसऱ्यांदा चहा घ्यायची इच्छा झाली कीं हिराच्या डोळयांतील अश्रु त्याच्यापुढें उभे रहात. कोटाकरितां उंची कापड घेण्याची हिरिरी आली

म्हणजे बहिणीच्या शीलाचा शालू गहाण पडला आहे, तो आधीं सोडविला पाहिजे, अशी मनाची टोंचणी सुरू होई. आज माघी पोर्णिमा होती. मावशीच्या सावकारानें आजच्या मध्यरात्रीची मुदत दिली होती. जयवंत पणजीला ज्या पेढीवर कारकून होता तेथें मागितलें तर दुखणेंदेखील मिळणें कठीण होतें. पण बाबापुता करून जयवंतानें चालू महिन्याचा पगार मिळविला व पांचशेंची भर झालेली पाहून आनंदित अंतःकरणानें आरवंद्याजवळ असलेल्या आपल्या गांवीं येण्याला तो निघाला. मध्यरात्रीला अजून बारा तास अवकाश होता. त्याच्या खिशात पांचशें रुपये होते व घर अवघें पांचसहा मैल उरलें होतें. आपण मुंगीच्या गतीनें गेलों तरीदेखील वेळेवर पोंचूं व हिराचें शील सुरक्षित राखूं अशी जयवंताची खात्री होती. त्यामुळें नोटांच्या पुडक्या-मुळें वर आलेल्या कोटाच्या भागावर हात फिरवून त्यानें समाधानाचा सुस्कारा सोडला.

जीवनशक्ति कमी झालेलें शरीर रोगाला ज्याप्रमाणें लवकर बळी पडतें, त्याप्रमाणें दारिद्र्यानें दुबळें झालेलें मन शंकाकुशंकांचें माहेरघर होतें. जयवंताच्या मनाची अशीच स्थिती झाली. या रहदारी नसलेल्या रस्त्यावर एखाद्या दांडग्या मनुष्यानें चोप देऊन आपल्याला नागवलें तर?या भिकारड्या रस्त्यानें जाणाऱ्या मोटारीचा धक्का लागून आपणांला अपघात झाला तर ? होडींतून नदीपार होतांना होडी उलटली तर ? तर हिराची स्थिति काय होईल ? त्याच्या डोळ्यांपुढें विहिरीच्या दगडांनीं जिचें डोकें रक्तबंबाळ झालें आहे अशी हिरा दिसूं लागली. पण सगळ्या देण्यांत जीव देणें कठीण आहे. अंगणांत आंचवायला जायचें असलें तरी जिला रात्रीं सोबत लागे त्या मुलीला जीव देण्याचा धीर होईल का ? भर मध्यरात्रीं विहिरीच्या कांठावर उभें राहून आपलें स्वयंवर मांडायचें व मृत्यूच्या गळ्यांत माळ घालायची! भावाच्या मित्राशीं चार शब्द बोलण्याचा धीर होत नसलेली सोळा सतरा वर्षांची कोंवळी पोरगी पिशाचवेळेला मृत्यूला हांक मारूं शकेल का ? बरें, मृत्यु तिची हांक ऐकेलच म्हणून काय नियम आहे ? जगांतल्या हरएक घरीं जाणारा

लहरी अतिथि तो. हिरानें पदरांत घेण्याविषयीं पदर पसरून विनंति केली आणि ती त्यानें ऐकली नाहीं तर?

जयवंताच्या डोळ्यांपुढें दुसरें चित्र दिसूं लागलें. त्याच्या अंगावर कांटा उभा राहिला. त्या पाजी सावकाराचे हात हिराच्या गळ्यांत पडले आहेत, तिचे ओठ व गाल त्याच्या पापी चुंबनानें विटाळून गेले आहेत. असली हिरा पुढें काय करणार? मुलाला वात्सल्यानें खेळ-विण्याऐवजीं कामुक नरपशूंना नट्टापट्टा करून खेळवीत बसणार, संध्याकाळीं कामावरून परत येणाऱ्या पतीची वाट पहात बसण्याऐवजीं श्रृंगार करून नव्या नव्या पुरुषांना जाळ्यांत ओढण्याकरितां खिडकींत उभी रहाणार!

जयवंताच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. दुर्दैवानें पोंखरून काढ-लेल्या मनांत कल्पनेच्या नुसत्या ठिणगीनें देखील आगीचा डोंब उडतो हें आज त्यानें अनुभवलें. भयंकर स्वप्नांतून जागें झाल्यावरदेखील हृदयाचें धड-धडणें जसे बंद होत नाहीं, त्याप्रमाणें आपल्याला दिसलेलीं चित्रें काल्पनिकच आहेत हें कळत असूनसुद्धां त्याच्या हृदयाची चलबिचल कमी झाली नाहीं. पांखराप्रमाणें अगर वाऱ्याप्रमाणें अनिर्बंध जातां येत असतें, तर आपण हां हां म्हणतां घरीं गेलों असतों व हिराला जवळ घेऊन मन-सोक्त रडून हृदयाचा भार हलका केला असता असें त्याला वाटूं लागलें. घर पावलोपावलीं जवळ येत होतें खरें; पण विवाहाचा मुहूर्त, परीक्षा, डॉक्टरांचा निकाल इत्यादि गोष्टी घटकेवर येऊन ठेपल्या हें नक्की ठाऊक असूनही त्यावेळीं पळदेखील ज्याप्रमाणें युगासारखें वाटूं लागतें त्याप्रमाणें जयवंताला या वेळीं ते पांच मैल पांच हजार मैलांप्रमाणें दिसूं लागले. त्याचें शरीर रस्त्यानें चालत होतें; पण मन गरुडाच्या भरारीनें घरीं जाऊन बसलें. त्याची समाधि लागली. काळगंगेंत वाहून गेलेले प्रसंग त्याला स्पष्ट दिसूं लागले.

जयवंत त्या वेळीं मराठी चवथ्या कीं पांचव्या यत्तेंत होता. त्याच्या एका वर्गसोबत्यानें त्याची उदाहरणांची चोपडी उतारा काढ-ण्यासाठीं घरीं नेली होती. चोपडी हरवल्यामुळें कीं काय दोन दिवसांनीं

आपण चोपडी नेलीच नाहीं असें तो म्हणूं लागला. “चोपडी पचणार नाहीं हं तुला. तूं नाहीं तुझा बाप देईल चोपडी” वर्गांत मार्क बुडूं लागल्यामुळें जयवंत संतापानें त्याला म्हणाला. “तुझी चोपडी द्यायला मला बाप तरी आहे; तुला तोदेखील नाहीं,” त्या मुलानें उत्तर दिलें. बाकीचीं मुलें खो खो करून हंसलीं. तें हंसणें लाव्हा रसाप्रमाणें जयवंताच्या हृदयाला दाहक वाटलें. इतरांच्या घरीं बाप असतात, मुलांना शाळेंत पोंचवायला किंवा त्यांची फी द्यायला ते शाळेंत येतात हें त्यानें पाहिलें होतें. त्यानें आपल्या लहानपणची शक्य तितकी आठवण करून पाहिली; पण बापासारखा कोणी पुरुष आपल्या घरांत असल्याचें त्याला आठवेना. शाळा सुटतांच गोरामोरा चेहरा करून तो घरीं गेला व आईला मिठी मारून त्यानें विचारलें,

‘आई, माझे बाबा कुठें ग आहेत?’ आई किती तरी वेळ स्तब्ध राहिली. नंतर ती म्हणाली, ‘जया, असें लहान मुलांनीं विचारूं नये हं.’

‘तें कां ग? इतर मुलांना बाप आहेत आणि मलाच कां ग नाहीं?’

‘तो पाताळेश्वराच्या देवळापाशीं अंधळा बसतो तो पाहिला आहेस ना? सगळ्यांना डोळे आहेत पण त्याला नाहींत. तसेंच आहे बरें हें.’

‘पण बाप नाहीं म्हणून बाकीचीं मुलें मला हंसतात. मला तें सोसत नाहीं ग.’

‘हंसतात त्यांचे दांत दिसतात. त्यांना म्हणावें माझी आई नी बाप एकच आहेत.’

हीन कुलाच्या जखमेंत पोरांनीं ‘बिनबापाचा’ ‘बिनबापाचा’ असें हिणवून मीठ भरलें आणि हंसरा जयवंत उदास झाला. लवकरच आपल्या धाकट्या बहिणीच्या कपाळीं हाच हलकट धंदा येणार आणि तिच्या संततीलाही हाच डाग व डागण्या लागणार हें त्याच्या लक्ष्यांत आलें. एकाच्या पापाचें प्रायश्चित्त दुसऱ्या निरपराधी जीवांनीं भोगत बसणें हा अन्याय आहे हें ओळखून त्यानें हिराला घरीं शिक्षण

द्यावयाला सुरुवात केली. त्याला चित्रें चांगलीं काढतां येत असत. अशोकवनांत सीता बसली आहे व रावण तिची मनधरणी करीत आहे असें चित्र काढून त्यानें सीतेची गोष्ट हिराला सांगितली. तें चित्र दाखवून जयवंत वर्णन करूं लागला,

" रावण सीतेला म्हणाला, ' तूं माझी बायको हो. मग ही सारी सोन्याची लंका तुझी आहे. ' सीतेनें उत्तर दिलें, ' तुझी लंका हिऱ्या-मोत्यांची असली तरी मला नको. तुझ्या सोन्याच्या लंकेपेक्षां पंचवटींतील आमची पर्णकुटी मला अधिक आवडते. ' रावण म्हणाला, ' तूं वेडी आहेस. कुठें माझीं जरीचीं वस्त्रें न् कुठें रामाचीं वल्कलें ! कुठें माझीं पंचपक्वान्नें न् कुठें राम तुला आणून देत असलेलीं कंदमुळें ! कुठें माझ्या महालांतली परांची गादी आणि कुठें अरण्यांतला रामाचा गवताचा बिछाना ! सीते, तूं माझी हो, या साऱ्या वस्तु तुला मिळतील. ' सीतेनें रागानें उत्तर दिलें, [ज्याला माळ घातली तो भिकारी असला तरी बायकोला कुबेर वाटतो; रंक असला तरी तिचा तो राजाच असतो. पति हाच सतीचा देव. "]

हिरा जयवंताकडे टक लावून सर्व गोष्ट ऐकत होती. शेवटीं चित्राकडे पाहून ती म्हणाली, " दादा, या चित्रांतली सीता माझ्यासारखी दिसते, नाहीं रे ? "

जयवंतानें बारकाईनें पाहिलें. खरेंच, सीतेचा चेहरा हुबेहुब हिरासारखा दिसत होता. तें चित्र जयवंताच्या हृदयांतून उतरलें होतें. त्याच्या हृदयांत हिराखेरीज दुसऱ्या कशालाच जागा नव्हती हेंच त्या साम्याचें कारण असावें. त्या साम्यानें आनंदित होऊन जयवंत हिराला म्हणे, " ताई, या चित्रांतली सीता तुझ्यासारखी आहे. तेव्हां तुला आतां सीतेसारखें झालें पाहिजे हं. "

जयवंताच्या शिकवणीनें शरीरविक्रयाबद्दल हिराच्या मनांत तीव्र तिटकारा उत्पन्न झाला. एखाद्या स्त्रीचा मौल्यवान दागिना चोरण्यापेक्षां तिच्या पतीचें मन हरण करणें अधिक निंद्य आहे, आपल्या पोटाची खळगी भरण्याकरतां एखाद्या कामुकाला शरीर विकून निर-

पराधी बायकापोरांना दुःखाच्या खाईत ढकलणें हें महापातक आहे, या गोष्टी तिच्या हृदयावर जणुं काय जयवंतानें कोरूनच ठेवल्या. पण शीलरक्षणाकरतां या भावाबहिणींची जी तळमळ चालली होती तिची पर्वा जग कुठें करीत होतें? घांसभर अन्नासाठीं रस्त्यावर भिकारी तडफडत असतांना, शरीराला जरूर नसलेलीं खाद्यपेयें खाण्यांत श्रीमंत जग चूर झालेलें असतें. फाटक्या जुनेरानें आपली अब्रू कशी संभाळावी या विवंचनेंत गरीब मोलकरीण असतांना, तिची धनीण आपल्या पातळाचा जरीचा पदर इतरांच्या डोळ्यांत भरण्याजोगा आहे कीं नाहीं हेंच पहात बसते. जगाच्या या स्वभावामुळें जयवंत व हिरा यांच्या अंतःकरणांतील आग कुणालाच दिसली नाहीं. आई मेली तेव्हां हिरा बारा वर्षांचीच असल्यामुळें त्या वेळीं तिच्या भावी आयुष्याविषयीं बोलणेंच निघत नसे. पण ती चवदा पंधरा वर्षांची होतांच मावशीची तारां-बळ होऊं लागली. पहिला पाऊस लागल्यानंतर पेरणीला विलंब करणारा शेतकरी जसा मूर्ख, त्याप्रमाणें नुकत्याच वयांत आलेल्या मुलीचा सौदा न करणारी बाईही वेडगळ, असेंच तिचें मत होतें. मराठी सात यत्ता झाल्यानंतर पुढें काय करावें हें जयवंताला न कळल्यामुळें तो घरींच राहिला होता. गांवांत इंग्रजी शाळा नाहीं. बाहेरगांवीं जायचें तर कुणाचा पाठिंबा नाहीं! हिराच्या जन्माची वाताहत होऊं नये ही तर मनांतली उत्कट इच्छा. शेवटीं मावशीनें निर्वाणीचें अस्त्र काढलें. ज्या सावकारानें हिराविषयीं तिच्याशीं संधान बांधिलें होतें त्याचे तुझ्या आईनें पांचशें रुपये देणें आहेत, ते पैसे फेडून मग हिराला वाटेल तिथें घेऊन जा, असें तिनें जयवंताला बजावलें. बुडणारा मनुष्य काडीचाही आधार घेतो त्याप्रमाणें जयवंतानें मिळेल ती नोकरी करण्याचा निश्चय केला. त्याच्या हातांतून उतरणाऱ्या चित्राप्रमाणें त्याचें अक्षरही सुंदर होतें. हें सुंदर अक्षर पणजी येथील एका व्यापाऱ्याच्या जमा-खर्चाच्या वह्यांत दिसूं लागलें. दोन वर्षें जीवाचा आटापेटा करून जयवंतानें पांचशें रुपये जमविले. मावशीनें ठरविलेल्या मुदतीचा शेवटचा दिवस आज असल्यामुळें ती रक्कम घेऊन तो आज घरीं चालला होता.

स्वतःभोंवतींच फिरत राहणाऱ्या भोंवऱ्याप्रमाणें मनुष्याचें मन आत्मनिष्ठ असतें. स्वतःसंबंधाच्या या विचारांत जयवंत इतका गढून गेला होता कीं त्यावेळीं त्याच्यासमोरून एखादा नाग फडा वर काढून गेला असता तर तोदेखील त्याला दिसला नसता. रात्रीं घरांतली सर्व माणसांची हालचाल बंद झाली तरी घड्याळ चालूच असतें. घड्याळा-प्रमाणेंच त्याच्या पायांचें काम चालू असल्यामुळें तो जवळजवळ नदी-पाशीं आला होता. रस्त्याच्या एका बाजूला दोन लहान मुलें खेळत होतीं. जयवंतानें कौतुकानें त्यांच्याकडे पाहिलें.

मुलगी म्हणाली, "भाऊ, तूं हो घोडा." मुलगा उत्तरला, "मी नाहीं होणार जा. मी घोडा नाहीं. माणूस आहें माणूस!" मुलगी काकुळतीच्या स्वरानें म्हणाली, "असं काय रे भाऊ? तूं माझा भाऊ ना? मी तुझी बहीण ना?"

मुलानें उत्तर न देतां गुडघे टेंकले व मुलगी त्याच्या पाठीवर सुतळीचा चाबूक मारूं लागली. हें दृश्य पाहून जयवंत सद्गदित झाला.

नदीजवळच्या चौकींत जाऊन जयवंतानें आपलें पाकीट उघडून दाखविलें. पांचशें रुपयांची भर जयवंतानें मोठ्या शिकस्तीनें केली होती. त्यामुळें पाकिटांत नवा कपडा अगर जकातीला योग्य असा कोणताच पदार्थ चौकीदाराला आढळला नाहीं. जयवंत घाईघाईनें नदीकडे गेला; पण होडी नुकतीच सुटली होती. शक्य तितक्या लवकर घरीं जायची इच्छा असल्यामुळें हा आपल्याला अपशकुनच झाला असें त्याला वाटलें. नदीच्या पाण्याच्या लाटा सप्सप् करीत बाजूला येऊन आपटत होत्या. समुद्राला भरती आली कीं खाडीवजा नदीलाही भरती येते; या दृष्टीनें समुद्र हा खाडीचा भाऊच नाहीं का, असा विचार त्या लाटा पाहून जयवंताच्या मनांत येऊं लागला. थोड्याच वेळांत पलीकडे जाण्याकरितां म्हणून बरीच गर्दी झालेली त्याला दिसली. नवीं लुगडीं नेसून आलेल्या बायका, जरीची टोपी घातलेलीं मुलें, केंस चापून चोपून बसविलेल्या मुली इत्यादि थाट पाहून आज पलीकडे कुठें तरी लग्न असलें पाहिजे असें त्याला वाटूं लागलें. मधांची बहिणभावंडेंही या

घोळक्यांत होतींच. मुलगा बहिणीला सांगत होता, ' मी आज शिट्टी घेणार, शिट्टी आणि साखरेचें माकड. '

पोपाखावरून मुंबईकर दिसणारा एक गृहस्थ बाजूलासा उभा होता. जयवंतानें त्याला सहज विचारिलें, ' काय हो, आज गर्दी कसली आहे ही ? "

" परमुलखांतून आलेले दिसतां तुम्हीं. आज तळवण्याचा भंडारा नाहीं का ? "

आतां जयवंताला सारें आठवलें. माघी पौर्णिमेला तळवण्याला मोठी जत्रा असते. हजारों लोक तिथें जातात. लहानपणीं तळवण्याच्या भंडाऱ्याला जाण्याचा हट्ट आपणदेखील धरला होता.

" येतां तर चला ना जत्रेला, " नवा गृहस्थ म्हणाला. " इतर जत्रांसारखी ही फाटकी तुटकी जत्रा नाहीं; एका रात्रींत माणूस शेंकड्यांनीं पैसे कमावतो. "

एका रात्रींत शेंकडों रुपयांची प्राप्ति ! जयवंत स्तंभितच झाला. आज दोन वर्षे रफू केलेला कोट घालून आणि खाणावळींतलें सर्वांत कमी दराचें अन्न खाऊन राहिलों तेव्हां कुठें पांचशें रुपये आपल्या दृष्टीला पडले. आणि या जत्रेंत एका रात्रींत शेकडों रुपये मिळतात. ही जडीबुट्टी आपणांला पूर्वी माहित असती तर आपण तरी पणजीला जाऊन रक्ताचें पाणी कशाला केलें असतें ? लक्ष्मीच्या मंदिराकडे जाण्याकरतां पायघड्या पसरलेली जवळची वाट असतांना डोंगर चढण्याची यातायात कोण करणार ? जयवंत स्तब्ध राहिलेला पाहून तो नवा गृहस्थ म्हणाला,

" राव, या गोष्टी ऐकीव नाहींत हं ! गतवर्षी भंडाऱ्याला गेलों तेव्हां खिशात एक रुपया होता, एक ! दुसरे दिवशीं अठराशें खिशांत घालून परत आलों. "

त्याचे इस्त्री केलेले कपडे, जरीचा रुमाल, हातांतील अंगठ्या वगैरे पाहून जयवंताला गतवर्षाच्या त्याच्या मिळकतीची खात्री पटली. पांचशेंवर त्याच्यापाशीं दोन कीं तीन रुपये शिल्लक होते.

आज पांचशें देऊन हिराची सुटका केली कीं या दोन तीन रुपयांवरतीं दोन जीवांचा संसार त्याला मांडणें भाग होतें. शिवाय पांचशेंची भर करण्याकरतां चालू महिन्याचा पगारदेखील त्यानें अगाऊच घेतला असल्यामुळें हिराला पणजीला घेऊन गेल्यावर एक महिनाभर तरी आपली भयंकर ओढगस्त होणार हें उघड उघड दिसत होतें. कुणीकडून मध्यरात्रीपर्यंत घरीं पोंचलें म्हणजे झालें, अशी तो आपल्या मनाची समजूत घालूं लागला. हिराला पाठविलेल्या पत्रांत कितीही रात्र झाली तरी मी नक्की येत आहे असें त्यानें लिहिलें असल्यामुळें त्याच्या मनानेंही या वेळीं फार आढेवेढे घेतले नाहींत. जयवंत विचारांत पडलेला पाहून तो नवा गृहस्थ म्हणाला, "विचार हा भिकेचा भाऊ! अहो, ज्याची हिमत त्याची दौलत. मोठ्या लढाया मारल्याखेरीज राज्यें मिळत नसतात. मी फक्त एक दिवस या जत्रेला येतों पण इतका पैसा कमावून जातों कीं तेवढ्यावर बारा महिने माझा संसार सुखानें चालतो."

"येतों मी तुमच्याबरोबर," हे शब्द जयवंताच्या ओंठांवर आले होते. पण "जयवंत, तूं जुगार खेळणार काय?" असे शब्द त्याच वेळीं हृदयाच्या गाभाऱ्यांतून त्याला ऐकूं आले आणि किंकर्तव्यमूढ होऊन तो स्तब्ध राहिला. उद्योगी मनुष्याला लक्ष्मी माळ घालते हें त्यानें पुस्तकांत वाचलें होतें. त्यानें दोन वर्षें हाडाचीं काडें केलीं असूनही लक्ष्मीनें त्याच्याकडे ढुंकूनसुद्धां पाहिलें नव्हतें. 'उद्योगाचे घरीं, ऋद्धिसिद्धि पाणी भरी' या म्हणीनें अंकलिपी वाचणाऱ्या बालमनाचें कदाचित समाधान होत असेल; पण जयवंताचें मन स्वतःशीं 'साहसाचे घरीं, ऋद्धिसिद्धि पाणी भरी' असेंच म्हणत होतें. पांचशेंवर असलेल्या दोनतीन रुपयांवर आपल्या नशिबाची परीक्षा पाहण्याचा त्यानें निश्चय केला. आपल्या नव्या मित्राकडे त्यानें होकारार्थी दृष्टीनें पाहिलें. जयवंताची येण्याची इच्छा आहे हें पाहून त्या गृहस्थानेंही लोखंड लाल असेपर्यंतच त्याच्यावर घाव घालण्याचें ठरविलें. इतर मंडळीपासून जयवंताला जरा दूर नेऊन तो म्हणाला,

"जुगाराला लोक वाईट म्हणतात; पण खरोखर सगळें जग जुगारी आहे. डॉक्टर रोग्याला वांचविण्याची, वकील आरोपीला फांसावरून सोडविण्याची किंवा मास्तर मुलाला वरच्या इयत्तेंत घालण्याची हमी थोडीच देतात! पण त्यांना लोक पैसे देतातच कीं नाहीं? शिवाय सगळें जग नशीबावर चाललें आहे बघा. जुगार म्हणजे नशीब! आणखी काय आहे दुसरें? जन्म हा जुगार, परीक्षा हा जुगार, लग्न हा जुगार, नी मरण हाही जुगारच. तुम्हीच पहा–'

होडी आल्यामुळें त्याचें हें तत्त्वज्ञान तेवढ्यावरच थांबलें. जयवंत त्या गृहस्थाशेजारींच होडींत उभा राहिला होता. जत्रेला जावें कीं जाऊं नये, नशीबाची परीक्षा पहाणें बरें कीं वाईट, हें त्याचें त्यालाच कळत नव्हतें. नीतिनियमांनीं बांधलेलें मन सांगत होतें, 'जुगार हें विष आहे. त्याची परीक्षा पहाणारे सगळे आजपर्यंत मेले आहेत.' दारिद्र्यानें गांजलेलें दुसरें मन म्हणत होतें, 'संवयीनें विष देखील बाधत नाहीं. हालाहलही पचनीं पाडणारा शंकर जगांत असतोच कीं नाहीं? बीं पेरलेंच नाहीं तर आपल्या नशीबीं फळ आहे कीं नाहीं हें कसें कळणार? जुगाराचा पैसा पापाचा, ही कल्पनाच चुकीची आहे. सगळें जग कायदेशीर जुगारच खेळत आहे. अव्वाच्या सव्वा नफा घेणारे व्यापारी, तारखा पुढें ढकलून दर तारखेची फी वसूल करणारे वकील, आजार विनाकारण लांबवून औषध टोंचण्याचे स्वतःला लाभदायक असलेले उपाय सांगणारे डॉक्टर, वर्गांत झोंपा काढून खासगी शिकवण्यांचा कर मुलांवर लादणारें मास्तर, हे सारे अट्टल जुगारीच आहेत. जयवंतानें नदीकडे पाहिलें; त्या काळ्याभोर पाण्यांत कांहीं एक दिसत नव्हतें. त्यानें वर मान करून तीराकडे पाहिलें. एक कोळी नदींत जाळें टाकून होडींत उभा राहिला होता. थोड्याच वेळांत त्यानें जाळें वर काढलें. जाळें माशांनीं नुसतें फुलून गेलें होतें. जयवंताला वाटलें, 'ज्या नदींत आपणाला कांहीं दिसलें नाहीं, तींतूनच या कोळ्यानें आपलें व बायकापोरांचें पोट बाहेर काढलें. मीही तीन रुपयांवर माझ्या नशीबाची परीक्षा कां पाहूं नये? नशीब ही अथांग नदी आहे; त्यांत जाळें टाकून

पाहिलेंच पाहिजे.' नशिबाची परीक्षा पहायला कांहीं रात्रीपर्यंत वाट पहायला नको, दुपारपासूनच मंडळी खेळायला बसतात, असें त्या नव्या गृहस्थानें सांगतांच जयवंताचा आनंद गगनांत मावेना. नशिबाचा वारा अनुकूल असला, तर आज आपल्या आयुष्याचें तारूं श्रीमंतीच्या बंदराला लागणारच लागणार असें त्याला वाटूं लागलें. मावशीच्या मुदतीचा शेवटचा दिवस म्हणून ज्याला आपण अशुभ मानीत होतों, तोच आपल्या भाग्याचा पहिला दिवस ठरणार. सर्वस्वाची होळी होण्याच्या भीतीऐवजीं वैभवाची गुडी आपण आज उभारणार. जयवंताचा मनोरथ वेगानें धावूं लागला. मी मी म्हणणाऱ्या विरक्तांनाही मोहिनी घालणाऱ्या आशेच्या स्मितयुक्त कटाक्षानें हा अल्लड अननुभवी तरुण मुग्ध होऊन गेला यांत नवल काय ?

आपल्या नवीन मित्राबरोबर जयवंत तळवण्याला जाऊन पोहोंचला. फराळाच्या दुकानांतलें थोडेंसें खाऊन व चहा पिऊन ते आपल्या कामाला लागले. रहदारीच्या रस्त्यापासून दूर अशा एका पडक्या घरांत जुगाराचा अड्डा बसला होता. तिथल्या लोकांची क्रूर दृष्टि आणि निस्तेज व कळाहीन चेहरे पहातांच जयवंताच्या काळजांत चर्र झालें. आपण दरोडेखोरांच्या अगर पिशाच्चांच्या टोळींत येऊन पडलों नाहीं ना, असें त्याला वाटूं लागलें. पण आतां माघार घेणें त्याला शक्यच नव्हतें. 'माझ्याजवळ फक्त तीन रुपये आहेत,' खेळायला बसतां बसतां तो म्हणाला. 'तिनीचे तीन हजार होतील,' कोणसें म्हणालें.

फांशांना हात लावतांना जयवंताची छाती धडधडूं लागली. संध्याकाळीं घरीं गेल्यावर हाच हात हिराच्या पाठीवरून आपण फिरविणार. तिला चटकन् या हाताचा चटका बसला तर? फांशांना हात न लावतांना उठावें व धूम पळत सुटावें, असा विचार त्याच्या मनांत आला. पण अभिमान व भीति यांच्या कात्रींत त्याचे हां हां म्हणतां तुकडे झाले. आपण जुगार खेळलों हें हिराला कळलें नाहीं तरी देवाला दिसल्यावांचून रहाणार नाहीं, हें मनांत येतांच त्याच्या पापभीरु मनाचा थरकांप झाला. तो गोंधळांत पडला. पण त्याचा नवा मित्र त्याला डिंवचून म्हणाला, 'अहो, असें काय करतां? नीट लक्ष द्या.'

कडू औषध पिणाऱ्या रोग्याप्रमाणें चेहरा करून जयवंत खेळूं लागला. आजपर्यंत त्याच्याशीं लपंडाव खेळणारी लक्ष्मी आतां त्याच्या हाताला लागली. त्याच्या पैशाची रास हां हां म्हणतां वाढत चालली. एका तासांत तीन रुपयांचे तीनशें झाले. एक मन म्हणूं लागलें, ' ऊठ, गळ्यापर्यंत पाणी आलें नाहीं तोंच किनाऱ्यावर जा. अति लोभ करूं नकोस.' दुसरें मन म्हणालें, ' आणखी एक डाव तर खेळून पहा तीनशेंचे सहाशें होतील.' जयवंत जागचा हलला नाहीं, खेळतच बसला. तळवण्याहून घर फार तर चार पांच मैल होईल. दीड तासाचा रस्ता, रात्री पौर्णिमेचें छान चांदणें, मग घाई कशाला ? रात्र पडल्यावर निघालें तरी वेळेवर पोंचतां येईल, अशा दृष्टीनें त्याचें मन विचार करूं लागलें. दारू व स्त्री यांप्रमाणें फांशांचीही निशा असते. त्या निशेंत आपण कुठें चाललों आहों, काय करीत आहोंत, याचें जयवंताला भानही राहिलें नाहीं. तो डावामागून डाव टाकीत होता. घड्याळाच्या लंबकाप्रमाणें आतां त्याचा एक डाव यशाच्या तर दुसरा अपयशाच्या टोंकाला जाऊं लागला. आपटल्या-मुळें जास्त उंच उडणाऱ्या चेंडूप्रमाणें त्याचें मन एक डाव हरला कीं दुसरा जिकण्याकरितां अधिक ईर्षेनें खेळूं लागे. जुगाराची दीपज्योति दुरून मनुष्याला आकर्षते. लोभी पतंग जोंपर्यंत तिच्याभोंवतीं घुटमळत असतात तोंपर्यंत त्यांना आगीपेक्षां तेजाचाच अनुभव जास्त येतो. पण एकदां का त्यांनीं त्या ज्योतीवर उडी घातली कीं ते तत्काळ होरपळून जातात. खेळाच्या निशेंत या कटु सत्याचें जयवंताला मुळींच स्मरण राहिलें नाहीं.

वयाबरोबर माणसाची, त्याप्रमाणें बैठकीच्या लांबीबरोबर जुगाऱ्यांची भूक वाढत जाते. जयवंत खेळायला बसला त्यावेळीं हिंदुस्थानच्या गरीब माणसाप्रमाणें तो रुपयांत व्यवहार करीत होता; पण संध्याकाळच्या सुमारास इंग्लंड अमेरिकेंतल्या मनुष्याप्रमाणें तो शंभर रुपयांच्या चवड्यांनीं खेळूं लागला. नशिबानें हात दिल्यामुळें अद्यापि त्याच्या मुद्दलांत तूट आली नव्हती. पण रात्रीबरोबर त्याचें दुर्भाग्यही

आलें. तो अधिकाअधिक डाव हरूं लागला. पाण्यांत बुडणारा मनुष्य भलती धडपड करून जसा अधिक गटंकळ्या खातो, त्याप्रमाणें जसजसें त्याला अपेश येऊं लागलें तसतसा तो मोठमोठ्या रकमा बोलून खेळूं लागला. भोंवतालीं दिवे लागलेले पाहून त्याला एकदम हिराची आठवण झाली व हृदय पिळवटल्यामुळें तो निघून जाण्याकरतां ताडकन् उठला. पण लगेच इतर लोकांनीं त्याला हात धरून खालीं बसविलें. 'हजार रुपये देणें झालें आहे तें देऊन मग हो चालता हवा तिथें' त्याचा जोडीदार म्हणाला. नक्रानें पाय धरल्यावर पटाईत पोहणारालादेखील जसें बाहेर येणें शक्य होत नाहीं, तशी जयवंताची स्थिति झाली. हृदयांत कालवाकालव होत असतांनाही त्याचें शरीर पुतळ्याप्रमाणें जागच्याजागीं स्थिर राहिलें. आतां चार अनुकूल डाव झाले कीं हें देणें फेडून टाकून निघून जावें असा त्यानें मनाशीं निश्चय केला. दैवानेंही त्याच्याकडे अजीबाद पाठ फिरविली नव्हती. दोन घटिकांत तो ऋणमुक्त झाला. झालें इतकें चिखलांत लोळणें पुरें असें मनांत आणून तो उठणार तोंच त्याचा जोडीदार म्हणाला,

'राव, आणखी एक डाव तरी खेळून चला. तीन रुपये घेऊन आलांत, दोन तीन प्रहर इथें तिष्ठत बसलांत आणि आतां हात हालवीत परत जाणार ?'

जयवंतालाही वाटलें एक डाव खेळून पहावा. एवींतेवीं चिखलांत उतरलों आहों खरें; मग एखादें कमळ तोडून बरोबर कां नेऊं नये ?

भरतीची शेवटची लाट व ओहोटीची पहिली लाट या लागोपाठ येतात. जयवंत एक डाव खेळण्याकरतां बसला खरा, पण प्रत्येक डाव उलटून त्याचा पाय खोलांत जाऊं लागला. मोठी रक्कम बोलून त्यानें जों-जों कर्जाच्या कचाट्यांतून सुटण्याचा प्रयत्न करावा तों तों त्याच्या डोक्यावरील ऋणाचा बोजा अधिकाधिक जडच होई. चारपांच हजारांपर्यंत त्याचें देणें झालेलें पाहून त्याचा जोडीदार ओरडून म्हणाला,

'दोस्तहो, या फटिंगाशीं मला खेळत बसवून तुम्ही माझें नुकसान मात्र केलेंत. उधारीच्या गोष्टी कराव्या तर याला गांवांत घर

आणि रानांत शेत आहे कीं नाहीं हें कुणाला ठाऊक! बस्स झाला याच्याशीं खेळ! काढ रे काढ तुझ्यापाशीं काय पैसे असतील ते!'

'तीन रुपये होते ते तर केव्हांच गेले,' जयवंत भीतियुक्त मुद्रेनें म्हणाला.

"अरे याच्या कोटाच्या आंतल्या खिशांत कांहीं तरी आहे. ती बघ डावी बाजू किती वर दिसते आहे. कांहीं छन् छन् आहे कीं नुसते पोकळ कागद रे?' सर्वांनीं जयवंताभोंवतीं गराडा घातला. आतां मार खाऊन वर दक्षिणा म्हणून पैसे देण्यापेक्षां आधींच पैसे देणें बरें असा विचार करून जयवंतानें खिशांतलें तें नोटांचें पुडकें त्यांच्या हातावर ठेवलें. आपल्या काळजाचा लचका तोडून आपण दुसऱ्याला देत आहों असें त्या वेळीं त्याला वाटलें पण करणार काय? फांशांनीं त्याच्या गळ्याला फांस लावला होता.

रिकामा खिसा व दुःखानें भरलेलें मन अशा स्थितींत जयवंत तळवण्याहून निघाला. हें काळें तोंड हिराला दाखविण्यापेक्षां नदींत जाऊन जीव द्यावा असा विचार त्याच्या मनांत आला. नऊ तरी खास वाजून गेले होते. पांचशें रुपये जिथें मोजायचे तिथें आपल्यापाशीं एक पैदेखील नाहीं. उघड्या डोळ्यानीं आपल्या बहिणीला आपण कुंटणखान्यांत ढकलणार! आपल्या वाटेकडे डोळे लावून बसलेली हिरा, भाऊ आलेला बघून किती तरी आनंदित होईल. पण सुखाच्या अस्मानांतून दुसऱ्याच क्षणीं ती दुःखाच्या पाताळांत जाऊन पडेल. कुठें तरी चोरी करून पांचशें रुपये मिळण्यासारखे असतील तर या वेळीं चोरीदेखील करायला हरकत नाहीं, ही कल्पनाहि त्याच्या मनांत येऊन गेली. व्यसनानें मन पोखरलें कीं पापी विचारांच्या भुंग्यांना त्यांत रहावयाला आयतीच जागा मिळते.

जीव देण्याच्या विचाराइतकी ती कृति सोपी असती तर जगांतील प्रत्येक प्रौढ मनुष्यानें आत्महत्या केली असेंच ऐकूं आलें असतें. देवाची दया असेल तर आजच्या विलक्षण पेंचांतूनही आपली व हिराची सुटका होईल अशी जयवंताला अंधुक आशा वाटत होती. तो वाऱ्या-

सारखा धांवूं लागला. वर चंद्रही जणुं काय त्याच्या सोबतीकरतांच त्याच्याबरोबर धांवत होता. आज जुगारानें आपले हात विटाळले खरे! पण चंद्राचें तेज जसें एका कलंकानें नाहींसें होत नाहीं त्याप्रमाणें आपलें आयुष्यही या एका पापानें फुकट जाणार नाहीं, असा धीर चंद्राकडे पहातां पहातां त्याला आला. रस्ता सरावाचा नसल्यामुळें त्याला एकदोनदां ठेंचदेखील लागली. पण हृदयाच्या वेदनांपुढें त्या ठेंचांच्या दुःखाचें त्याला कांहींच वाटलें नाहीं. मधूनच दम लागला कीं तो हळू चाले. पुन्हां आपल्याला पोंचायला उशीर होईल म्हणून धांवूं लागे. रस्त्याच्या कडेचीं झाडें आपल्या फांद्या हालवून 'जा, धांवत जा,' असें आपणांस सांगत आहेत असा त्याला भास झाला. चांदण्याच्या प्रवाहांत सारें जग बुडून गेलें होतें; पण जयवंताच्या अंगाची काहिली होत होती. आकाशांत पांढरे शुभ्र मेघ इतस्ततः पसरले होते. जणु काय कोमल चंद्राचा प्रवास सुखकर व्हावा म्हणून परांच्या पायघड्याच पसरल्या होत्या तिथें. धांवतां धांवतां कुठें तरी बाजूला बहरलेल्या निशिगंधाचा सुवास जयवंताला आला. सारी सृष्टि आनंदांत व उत्सवांत रममाण झालेली पाहून जयवंत संतप्त झाला. दुसऱ्याच क्षणीं त्याच्या हृदयांतून कोणी तरी बोललें 'सृष्टी कधीं जुगार खेळत नाहीं, नशीबाची भलत्या मार्गानें परीक्षा पहात नाहीं; म्हणूनच ती आनंदांत आहे.' जयवंताला हें पटलें. दिवसा प्रकाशण्याची चंद्रानें व फुलण्याची निशिगंधानें कधींही धडपड केली नाहीं. माघमासांतील मेघ पावसाळ्यांतील मेघांशीं आपली तुलना करून कधींच दुःखी होत नाहींत.

भांबावून गेल्यामुळें फांटे फुटतात त्या ठिकाणीं आपण रस्ता चुकलों हें त्याला लवकर कळून चुकलें. जखमेवर जखम झाली. हेलपाटा घेऊन तो पुन्हां थोडा परत आला व दुसऱ्या रस्त्यानें जाऊं लागला. त्याचें सारें लक्ष घराकडे लागलें होतें. जसजसें घर जवळ येऊं लागलें तसतसें त्याचें पाऊल मंदावलें. हिराला काय सांगूं? चोरांनीं लुटलें म्हणून सांगितलें तर तिचा विश्वास बसेल का? पुन्हां पांचशें रुपये मिळवायला दोन वर्षें पाहिजेत. तेवढी मुदत मावशी व सावकार हिराला

*देतील का ? एक ना दोन, अनेक प्रश्न त्याच्या मनांत थैमान घालूं लागले. पुढल्या बाजूपेक्षां मागच्या बाजूनें जाणें बरें असें वाटून तो आपल्या परसांत शिरला.* पहातो तों उजवीकडल्या विहिरीच्या बाजूला दिवे दिसत होते. जयवंताचे पाय गारठून गेले ! हृदय केवळ्यानें तरी धडधडूं लागलें. हलुहलु विहिरीजवळच्या झाळकीच्या आड तो उभा राहिला. विहिरीपाशीं उभा असलेला एक मनुष्य म्हणत होता, "काय वेडी पोर हो ! पांच मिनिटांनीं सावकाराची पट्टराणी होणार होती. बाहेर जाऊन येतें म्हणून सांगितलन् आणि येऊन विहिरींत उडी टाकली !"

थोड्याच वेळांत हिराला विहिरींतून वर काढण्यांत आलें. विहीर फारशी रुंद नसल्यामुळें तिच्या कपाळाला व हातापायांना चांगलीच इजा झाली होती. कुठें थोडेंसें खरचटलें होतें तर कुठें चांगलें रक्त येईपर्यंत लागलें होतें. तिच्या अंगावरील पातळ ओलें असल्यामुळें अंगाबरोबर चापून चोपून बसविल्यासारखें दिसत होतें. केंसावरून निथळणारें पाणी दिव्याच्या प्रकाशांत सरांतून गळून पडणाऱ्या मोत्याप्रमाणें भासत होतें. हिराच्या कपाळावरील व अंगावरील रक्त पाहून 'तूं, तूं हें रक्त काढलेंस. वहिणीचा खून करणारा बेरड तूं,' असें कोणी तरी आपणांला म्हणत आहेसें जयवंताला वाटलें. चटकन् पुढें जावें व हिराला पोटाशीं घट्ट धरून तिच्या जखमांतून बाहेर येणारें रक्त अश्रूंनीं धुवून काढावें अशी त्याला प्रबळ इच्छा झाली. पण सावध झाल्यावर भावानें पैदेखील आणली नाहीं, आतां आपल्या सुटकेची तिळभरदेखील आशा राहिली नाहीं, असें पाहून ती पुन्हां निराशेनें मूर्च्छित् पडेल ही कल्पनाही त्या इच्छेच्या पाठोपाठ त्याच्या मनांत उभी राहिली. आपण पांचशें रुपये घेऊन येणार व सावकाराच्या हातून हिराची सुटका करणार ही गोष्ट शेजाऱ्यापाजाऱ्यांना थोडी फार माहित असण्याचा संभव असल्यामुळें आपण हात हालवीत आलेलों पाहून सर्वजण आपणाला छीः थू करतील ही भीतीहि त्याला भेडसावूं लागली. जयवंत या भिन्नभिन्न विचारांच्या घोळांत फिरत आहे इतक्यांत त्याच्या मावशीसह सावकार विहिरीकडे आले. 'फार कांहीं लागलें नाहीं. आतां थोड्याच वेळांत सावध होईल,'

हातांत दिवा घेऊन उभा असलेला इसम म्हणाला. ‘ शर्थ झाली बाई अलीकडच्या पोरींची. आमच्या वेळेला कांहीं बाई असली चालरीत नव्हती. यजमानांना भेटायला कशा एका पायावर तयार असत पोरी, ’ मावशीनीं मल्लिनाथी केली. सावकारांनीं हिराकडे निरखून पाहिलें व ते म्हणाले, ‘ जखमा मोठ्या नसल्या तरी लागलें आहे बरेंच. कुणी तरी जाऊन मोटार आणा जा. वेंगुर्ल्याच्या इस्पितळांत ठेविलें म्हणजे हां हां म्हणतां ती बरी होईल. ’ ‘ कशाला हवी वेंगुर्ल्याला पाठवायला ? इतका तुमचा पैसा वर आला आहे कीं काय ? लावलीं चार झाडपाल्याचीं ओषधं म्हणजे होईल महिनाभरांत बरी ! ’ मावशींनीं सूचना केली. ‘ बरी व्हायला महिना सोडून दोन महिने लागले तरी हरकत नाहीं पण म्हणतात ना, देण्याची न् दुखण्याची हयगय होऊं नये. तुमची हिरा म्हणजे हिरा आहे नुसता मावशी ! कुबेराची संपत्ति ओंवाळून टाकावी तिच्यावरून. ’ ‘ आहेच माझी बाळ तशी गुणांची. ’ तोंडाला पाणी सुटल्यामुळें मोहरा बदलून मावशी म्हणाल्या. हिराला उचलून घेऊन सर्व मंडळी घराकडे गेली. जयवंत मात्र जिथल्या तिथें उभा होता. त्यानें वर पाहिलें तों पौर्णिमेचा चंद्र पूर्ववत् हंसत होता. ज्या विहिरीला घटकेपूर्वी मृत्यूच्या जबड्याचें रूप आलें होतें ती आतां अत्यंत शांत व सौम्य दिसत होती. पाचोळ्यावर पाऊल पडून आवाज होईल म्हणून संभाळून जयवंत विहिरीकडे गेला. हिराला कांठा-वर .जिथें ठेविलें होतें त्या जागेजवळ गुडघे टेकून तो ढळढळां रडूं लागला. आपले हुंदके कोणाला ऐकूं जातील तर नकळत निघून जाण्याचा बेत पार पडणार नाहीं म्हणून त्यानें अश्रु व हुंदके आवरले आणि त्या जागेचें वांकून चुंबन घेतलें. चांदण्यांत त्या ठिकाणीं पडलेले हिराच्या रक्ताचे थेंब त्याला दिसले. ते पाहून त्याच्या अंगावर शहारे उभे राहिले. तें रक्त रागानें आपल्याकडे पहात आहे असा त्याला भास झाला. सर्प पाहून दचकावें त्याप्रमाणें तो मागें सरला, आणि पाऊल न वाजवितां परसांतून पसार झाला.

हिराला सावकार वेंगुर्ल्याच्या इस्पितळांत महिना पंधरा दिवस तरी ठेवणार. या अपघातानें हिराच्या सुटकेची मुदत तेवढी तरी वाढली

असें मनांत येऊन जयवंताला बरें वाटलें. पण मुदतीबरोबर कर्जाचा बोजाही वाढला हें लक्षांत येतांच त्याचे हातपाय गळून गेले. हिरा बरी व्हावी म्हणून सावकार चारदोनशें रुपये तरी खर्च करणार. जरूर असणाऱ्या रकमेला आपल्याला कोणी विकत घेईल तर आपण जन्माची गुलामगिरीदेखील पत्करूं, असें तो स्वतःशीं म्हणत होता. पण सगळें जग पैशाचें गुलाम झाल्यामुळें जिथें गुलाम विकत घेण्याची चालच बंद पडली तिथें बिचाऱ्या जयवंताची इच्छा फलद्रूप कशी होणार ? गांवांतील निर्जन रस्त्यानें जात असतांना वाटेंत त्याला सावकारवाडा लागला. त्यांतील घरांकडे दृष्टि जातांच जयवंताचें मन क्षुब्ध होऊन गेलें. दारुबाजी, वेश्यागमन, वगैरे व्यसनांसाठीं पाण्या सारखा पैसा खर्च करण्याचें सामर्थ्य या लोकांना देवानें द्यावें आणि बहिणीच्या शीलाची राखरांगोळी होऊं नये म्हणून धडपड करणाऱ्या आपल्यासारख्या मनुष्याला त्यानें कफल्लक ठेवावें याचा त्याला फार राग आला. क्षुब्ध, खिन्न, अर्धवट भ्रमिष्ट अशा मनःस्थितींत त्यानें कशीबशी पणजी गांठली. वाटेंत पुढें जाणारा वाटसरू दिसला कीं याच्या खिशांतलें पैसे सांपडतील तर किती बरें होईल, हा विचार त्याच्या मनांत आल्यावांचून रहात नसे.पेडण्याहून म्हापशाला जातांना त्याला एक व्यापारी भेटला. त्याचेजवळ हजारपांचशेंचा ऐवज असावा असें त्याच्या बोलण्यावरून दिसलें. रस्त्यावर मागेंपुढें कोणीच नव्हतें. याची हृदयक्रिया एकदम बंद पडून हा जागच्याजागीं मेला तर किती बरें होईल,असा दुष्ट विचार त्याच्याशीं बोलतां बोलतां जयवंताच्या मनांत चमकून गेला. त्याच्या मृत्यूमुळें अनाथ होणारीं त्याचीं बायकापोरें डोळ्यांपुढें उभीं राहतांच मात्र जयवंताला आपल्या दुष्ट विचारांची लाज वाटूं लागली.

पणजीला पोहोंचतांच त्याच्या मालकानें विचारलें, 'कां हो, आजारी बिजारी होता कीं काय? चेहरा अगदीं उतरलेला दिसतो.' 'प्रवासाचा शीण असेल' असें उत्तर देऊन जयवंतानें वेळ मारून नेली. घाण्याला जुंपलेल्या बैलाप्रमाणें मुकाट्यानें जमाखर्चाच्या कामाला लागण्याखेरीज त्याला गत्यंतरच नव्हतें. जमाखात्याला शेंकड्यांची

रक्कम लिहितांना समुद्रांत बुडून आपण कोरडेच रहात आहों याची पदोपदीं त्याला आठवण होऊं लागली. आपल्या मालकापाशीं बराच पैसा शिल्लक आहे हें त्याला कांहीं कुणी सांगायला नको होतें. पण दुथडी भरून जाणाऱ्या गंगेचा उपयोग मारवाडांत तळमळणाऱ्या प्रवाशाला कसा होणार ? श्रीमंतांच्या सांठवून ठेवलेल्या पैशानें जगांतील किती तरी माणसें सुखी होऊं शकतील. पण स्वतःला पैशाची ऊब पाहिजे म्हणून इतर थंडींत कुडकुडत असले तरी ते पर्वा करीत नाहींत. बुद्धिमान् मुलांच्या महत्त्वाकांक्षा पैशाच्या अभावीं गोठून जातात. गोरगरीबांच्या उमेदी पैशाच्या अभावीं जमीनदोस्त होतात. अनाथ अपंगांचे प्राण पोटाच्या आगींत जळून जातात आणि शेंकडा नव्वद लोक असे तडफडत, होरपळत, किंकाळत असतांना लोक आपल्या तिजोऱ्यांना भक्कम कुलपें ठोकतात, बँकबुकें पाहून आनंदित होतात आणि दागिन्यांची मिरवणूक काढीत बसतात. तांब्याच्या पैशाला महाग झालेल्या जयवंताला हें सर्व तत्त्वज्ञान सुचणें स्वाभाविक होतें. साध्या धुरानें डोळ्यांतून पाणी येतें; उलट श्रीमंतीच्या धुरानें डोळ्यांतील पाणी आटतें ही गोष्ट त्यानें लक्षांत आणली असती तर आपल्या तत्त्वज्ञानाचा फोलपणा त्याला सहज कळून चुकला असता.

पण श्रीमंतांना मनांतल्या मनांत लाखोली मोजून तो लक्षाधीश थोडाच होणार होता ? लढाया उत्पन्न करून स्वतःच्या महत्त्वाकांक्षांची तृप्ति करणाऱ्या मुत्सद्यांच्या नांवानें शिपायांच्या बायकांनीं कितीही बोटें मोडलीं तरी त्यांचे घरधनी लुळेपांगळे होऊन घरीं यायचे कांहीं चुकत नाहींत. ‘ काय करावें ? ’ हें पंचाक्षरी भूत जयवंताला रात्रंदिवस भेडसावूं लागलें. त्या भूताला वठणीला आणणारा पंचाक्षरी कुठें शोधायचा हेंच त्याला कळेना. फांशीची शिक्षा झालेला मनुष्य एक एक दिवस मागें पडला म्हणजे जसा अधिकाधिक खिन्न होतो तशी जयवंताची स्थिति झाली. पणजीला आल्यापासून तिसरे कीं चवथे दिवशीं शेजाऱ्च्या पेढीवरील कारकुनाला सोडतींत तीन हजार रुपये आल्याची बातमी त्याला कळली. पांच दहा रुपयांच्या भांडवलांवर तीन हजार रुपये नफा !

जयवंताचें रक्त सळसळूं लागलें. आतां धांवत जाऊन सोडतीचीं तिकिटें घ्यावीं असें त्याला वाटूं लागलें. चार पांच ओळखीच्या लोकांकडे जाऊन महिन्याच्या बोलीनें त्यानें प्रत्येकाकडून रुपया दोन रुपये मिळविले व देवाचें नांव घेऊन सोडतीचीं तिकिटें घेतलीं. सोडतीच्या लक्ष्मीच्या गर्भवासाची मुदत महिन्याची असल्यामुळें पुढील सर्व महिना त्यानें आशाळभूतपणानें काढला. सोडतींत मोठें बक्षीस मिळाल्याचीं त्याला स्वप्नें पडूं लागलीं.

पण भक्त एकनिष्ठ असला तरी देवतेच्या चंचलपणाला तो कसा आळा घालूं शकणार? सोडतीचें बक्षीस मिळाल्यावरच हिराला पत्र पाठविणें बरें असें वाटून जयवंत स्वस्थ बसला होता. सोडतीच्या निकालांत त्याला हजाराचें लांब राहो, तीन रुपयांचेंदेखील बक्षीस मिळालें नाहीं. उसने काढलेले पैसे मात्र भरावे लागले. या अपेशानें जयवंताची सोडतींत पैसे घालण्याची इच्छा मंदावण्याऐवजीं बळावली. कारण त्याला नाहीं तरी दुसऱ्या कितीकाना मोटमोठ्या रकमा मिळाल्या होत्या. आज ना उद्यां आपलीही भाग्यरेषा उमटेल अशी तो आपली समजूत करून घेऊं लागला. झाडावर मारलेल्या पहिल्याच धोंड्यानें फळ पडत नाहीं, पेरलेल्या धान्यांतले सगळेच कण उगवत नाहींत, वगैरे दाखल्यांनीं मनाचा हताशपणा त्यानें नाहींसा केला. दुसऱ्या खेपेला खाणावळीपुरते पैसे ठेवून बाकीचे सर्व त्यानें सोडतींत घातले. पण सोडत त्याच्यावर प्रसन्न झाली नाहीं. जयवंतही हट्टाला पेटला. आपले थोडेफार पैसे गेलेच आहेत, आतां थोडक्यासाठीं माघार घेणें शहाणपणाचें नव्हे असें म्हणून तो दर महिन्याला नोटा देऊन त्यांच्या ऐवजीं तिकिटें संपादन करूं लागला. बक्षीस आल्याशिवाय हिराला पत्र लिहिण्यांत अर्थ नाहीं असें जें त्याच्या दुबळ्या मनाला वाटत होतें तेंच बरोबर आहे अशी त्याची पक्की खात्री झाली.

पगाराच्या पैशांनीं फारशीं तिकिटें येत नाहींत म्हणून मिळेल तेवढें कर्ज काढण्याची कुबुद्धि ओघानेंच त्याला सुचली. व्यापारी नाहीं कां कर्ज काढून व्यापार करीत? विद्यार्थी नाहीं का कर्ज काढून शिकत? त्यांतलाच

ह्या प्रकार, हें मनाच्या टोंचणीला त्याचें ठराविक उत्तर असे. हिराची आठवण होऊन पैशाच्या या मृगजळामागें धांवायचें नाहीं, आपल्या मनगटाच्या शक्तीनें विहिरीचें पाणी काढून प्यायचें असें त्यानें एकदोनदां मोठ्या मनोनिग्रहानें ठरविलें. पण पहिल्या खेपेला त्याच्या खालच्याच नंबराला पांच हजारांचें बक्षिस आलें. झालें! अवघा एकच नंबर चुकला! बक्षीस आपल्याजवळ येऊं लागलें आहे असें लोभानें अंध झालेल्या त्याच्या मनाला वाटलें. बक्षीसाचा पायंडा पडला, नशीबाची नजर अनुकूल झाली, आतां हां हां म्हणतां आपण भाग्याच्या शिखरावर जाऊं अशी मोहिनी यामुळें त्याला पडली. तब्बल एक वर्ष तो या मृगजळामागें धांवत होता. पगाराचा सर्व पैसा जाऊन वर पांचशें रुपये कर्ज झालें. 'पैसे केव्हां देतां?' असा प्रश्न पदोपदीं विचारला जाऊं लागल्यामुळें गांवांतून फिरण्याची त्याला चोरी झाली. घुबडाप्रमाणें एका भिकारड्या खोलींत कामाखेरीजचा सर्व वेळ तो काढूं लागला.

पृथ्वीची सूर्याभोंवतालची एक प्रदक्षिणा पुरी झाली. पुन्हां माघी पौर्णिमा आली. वेळ झाली कीं दारुबाजाला दारुवांचून जसें सुचेनासें होतें त्याप्रमाणें जयवंताचें झालें. मागच्या माघी पौर्णिमेला तळवण्याला आपण पांचशें रुपये गमावले. या पौर्णिमेला पांच हजार कमावण्याचा योग नसेल कशावरून? 'गमावेल तो कमावेल' हेंच खरें. बस्स! तळवण्याच्या जत्रेला जायचें व नशिबाची शेवटची परीक्षा पहायची. पैसे मिळाले तर घरीं जाऊन हिराला भेटायला कांहीं हरकत नाहीं. पण हिरा आतां कोणत्या स्थितींत असेल? एक वर्ष होत आलें. आपल्याकडून बोटभर चिठ्ठीदेखील नाहीं. शीलरक्षणाकरितां तिनें जीव दिला असेल कीं ती सावकाराची राख होऊन बसली असेल? जयवंताच्या अंतःकरणाला इंगळ्या लागल्या. पण स्वस्थ बसून कांहींच उपयोग नव्हता. तळवण्याच्या जत्रेंत पांच हजार रुपये मिळतील खरे! पण पांच हजारांचें पीक काढायला शेंदोनशें पेरले पाहिजेत ते कुठून येणार? ओळखीचा मनुष्य आतां त्याला एक पैदेखील द्यायला तयार नव्हता. दुकानांतल्या पैशाखेरीज दुसरा मार्ग जयवंताला दिसेना. तळवण्याला जाऊन यायला

अवघे दोन दिवस लागतील. दुकानाच्या चालू हिशेबांतील शेंदोनशें रुपये दोन दिवस वापरले म्हणून काय होतें ? आधीं दर्यामें खसखस एवढीच ती रक्कम ! तिची अफरातफर झाल्याचा पत्ता मालकांना लागतांना पंचाईत. लागला तर शेंभर रुपये जास्ती देऊन त्यांचें तोंड बंद करितां येईल. दोन दिवसांत तो फिर्याद तर करायला जात नाहीं. पौर्णिमेच्या आदल्या दिवशीं मालक जेवायला घरीं गेलेले बघून त्यानें किल्ल्या चालवल्या व दोनशेंच्या नोटा काढून घेतल्या. गतवर्षाप्रमाणें दोन दिवसांची रजा काढून त्यानें तळवण्याचा रस्ता सुधारला.

गेल्या सालाप्रमाणें यंदाही त्या पडक्या घरांत जुगाराचा अड्डा बसला होता. जयवंताच्या ओळखीचे बरेचसे चेहरे तिथें दिसत होते. फांशांना हात लावतांना आज त्याचें हृदय धडधडलें नाहीं, पापपुण्याची भीति त्याच्या मनांत उभी राहिली नाहीं. अंगांत वारें संचारल्याप्रमाणें तो जोराजोरानें डाव टाकीत होता, डाव जिकला कीं मोठमोठ्यानें हंसत होता, आणि डाव हरला तरी डरत नव्हता. आज लक्ष्मीला फरफर ओढून माझ्याकडे तरी आणीन, नाहीं तर मृत्यूच्या गळ्याला मिटी तरी मारीन असा त्यानें निश्चयच केला होता. हळुहळु तिन्हीसांज झाली. दोनशेंच्या भांडवलावर जयवंतानें बावीसशेंची कमाई केली होती. परंतु तेवढ्यानें त्याचें समाधान झालें नव्हतें. तो खेळतच राहिला होता. इतक्यांत जवळच्याच गड्यापैकीं एक दुसऱ्याला ‘काय राव ? आज तुमचें लक्ष खेळांत नाहीं. हिराकडे गेलें आहे वाटतें ? पण सांभाळा हो ! हिरा पचवायला फार कठीण असतो ’ असें कायसें म्हणाला. तें त्याच्या कानांवर पडलें. त्या वाक्याचा अर्थ ध्यानांत घेण्याइतका तो भानावरच नव्हता. पण ‘हिरा’ या शब्दानें त्याला बहिणीची आठवण झाली. क्षणमात्र भगिनीप्रेमानें जुगाराच्या मोहावर मात केली. हिराकडे जाण्याकरतां जयवंत उठला व दाराकडे वळला. दारांत त्याला विलक्षणच देखावा दिसला. त्या घराला पोलिसांनीं घेरलें होतें. दारांतल्या जयवंताच्या छातीवर बंदुक रोंखून एक अधिकारी म्हणाला,

"मुकाट्यानें स्वाधीन होतोस कीं नाहीं ?"

मघांशीं जयवंताच्या हातांत फांसे व पैसे खुळखुळत होते; आतां त्याच्या हातांत हातकड्या खळखळूं लागल्या.

जुगार खेळण्याच्या गुन्ह्याबद्दल जयवंत तुरुंगांत गेला. त्यांतच दुकानावरील पैशाच्या अफरातफरीची भर पडून तो पक्का बदमाष ठरला. आतां महिनेच्या महिने त्याला सरकारचा पाहुणचार घेत बसायचें होतें. सकाळपासून संध्याकाळपर्यंतचा त्याचा वेळ सक्तमजुरींत कसा तरी जाई; पण त्याच्याभोंवतालचें सारें जग निद्राधीन होऊं लागलें कीं त्याच्या मनांतील जग जागृत होई. तीन चार वर्षांपूर्वी घरीं निर्मळ, निष्पाप हिराला सीतासावित्रींच्या गोष्टी सांगत सांगत तो झोंपीं जात असे. जुगार, दारु, वेश्या, खोटी साक्ष हींच ज्यांचीं आराध्यदैवतें अशा सोबत्यांच्या सहवासांत आतां त्याला निद्रेची आराधना करावी लागे. त्याचें मन मेलेलें नसल्यामुळें अशा स्थितींत त्याचा चार चार तास डोळादेखील लागत नसे. रस्त्यांतल्या भिकाऱ्याला, घरात अन्नाचा कण नसणाऱ्या भणंगाला, साऱ्या जगानें झिडकार-लेल्या अनाथालादेखील जी निद्रामाता जवळ करते तिनें आपल्याकडे ढुंकूनदेखील पाहूं नये इतके आपण पतित झालों असें त्या भयाण वेळीं जयवंताला वाटूं लागे. भीति, पापवासना इत्यादि दुष्ट विकारांप्रमाणें पश्चात्ताप, दृढनिश्चय इत्यादि कोमल विकारही रात्रीच्या पोटीं जन्माला येतात. या कुशीवरून त्या कुशीवर वळतांना हिरा आपणाकडे तांबडे लाल डोळे करून पहात आहे असा जयवंताला भास होई व भीति वाटून तो आपले डोळे मिटून घेई. पण मिटलेल्या डोळ्यांनाही हिरा दिसूं लागे. 'दादा, माझ्या जन्माचा सत्यानाश तूं केलास, दादा, तूं केलास,' हे तिचे शब्द त्याच्या कानांत तापलेल्या तेलाप्रमाणें शिरत असत. त्या शब्दांचा मार असह्य झाला कीं जयवंत एखाद्या लहान मुलाप्रमाणें ढळढळां रडूं लागे. पण तिथें त्याचें सांत्वन करायला कोण येणार होतें ? दुसरे दिवशीं त्याचे डोळे ओढलेले दिसले कीं त्याचे सोबती विचारीत 'रात्रीं झोंप आली नाहीं वाटतें ? खरं आहे बाबा !'

झाडलोट, दळण वगैरे शंभर कामें केलीं तरी हात कांहीं फाशांची आठवण विसरणार नाहींत. शिवाय दारूचा पेला आणि गुलजार नायकिणीची हनुवटी ह्याची चटक जाणार तरी कशी? 'असले प्रश्न ऐकतांच जयवंत लज्जेनें खालीं मान घाली.ज्या गोष्टी त्यानें स्वप्नांतदेखील चींतिल्या नव्हत्या त्यांचा आरोप त्याच्यावर लादला जात होता. पण उजळ माथ्यानें या आरोपांचा त्याला इनकार करतां येणें शक्य नव्हतें. वेर्जी उतरलेल्या व उकिरड्यावर पडलेल्या मोत्याच्या दाण्याची मूळची किंमत दुरून जाणाऱ्या लोकांना कशी होणार? उकिरडा फुंकायला येणाऱ्या गाढवांशींच त्या मोत्याची गांठ पडायची व त्यांच्या पायांखालीं चुरून जाण्यांतच त्याचा शेवट व्हावयाचा.

सरकारी इमारती, बगीचे वगैरे ठिकाणीं कैद्यांना कामाला नेत असत. अशा वेळीं जयवंताला आपला चेहरा अजीबात बदलला असता तर किती तरी बरें झालें असतें असें वाटूं लागे. शाळेला जाणारीं लहान मुलें भूतपिशाच्चांकडे पहावें त्याप्रमाणें विस्मित व भयभीत दृष्टीनें त्यांच्याकडे पहात. एकदां तर आपल्या गांवीं आपल्याबरोबर मराठी शाळेंत असलेला एक मुलगा जयवंताला दिसला. त्याच्या मागें एक पट्टेवाला चालला होता. कैद्यांच्या बरोबरच्या शिपायानें त्याला सलाम केला. त्यावरून तो कोणी तरी अधिकारी असावा हें उघड दिसलें. त्यानें व जयवंतानें एकमेकांकडे एकाच वेळीं पाहिलें. दोघांनाही ओळख पटली पण कुणीच ओळख दिली नाहीं. या वेळीं धरणी दुभंगून आपल्याला पोटांत घेईल तर बरें होईल असें जयवंताला झालें. शाळेंत त्याच्याखालीं नेहमीं नंबर असणारा मनुष्य पट्टेवाला व सलाम घेऊन अधिकारी म्हणून मिरवत जात होता आणि त्याच्यापेक्षां हुशार म्हणून गाजलेला जयवंत हातांपायांत बेड्या घालून घेऊन शिपायांच्या देखरेखीखालीं रस्त्यांची झाडलोट करण्याला चालला होता. या अध:पतनाचें मूळ काय? दुर्दैव? मुळींच नाहीं. त्या दिवशीं तळवण्याला जाण्याचा मोह जर आपण आवरला असता तर आज आपणांला तुरुंगांत यावें लागलें नसतें. आपण गरीब

राहिलों असतों तरी आपल्या या शाळासोबत्याइतक्याच उजळ माथ्यानें जगांत फिरायला आपणाला कोणतीही हरकत नव्हती. हिराच्या हातची पेज बासुंदीपेक्षां गोड लागली असती आणि आपल्या सुखाला पारावार उरला नसता! पण हें सगळें तळवण्याला गेलों नसतों तर! पश्चात्तापाच्या अग्नींतही जळून न जाणारीं कांहीं पापें असतातच. जुगार हें त्यांतलेंच पाप आहे.

त्याचें अनुतप्त मन स्वतःशीं नेहमीं 'ढेंकणाच्या संगें हिरा तो भंगला' हा चरण गुणगुणूं लागलें. यःकश्चित् दिसणाऱ्या जुगारानें आपणांला माणसांतून उठविलें, आपल्या मनोरथाचे तुकडे तुकडे केले, आपल्या चरित्रपटाला डांबर फांसलें, ही जाणीव तीव्र झाल्यामुळें त्याला हा चरण म्हणजे जणुं काय स्वतःच्या आयुष्याचें शब्दचित्रच वाटूं लागला. तळवण्याला जुगारी टोळी पकडली गेली त्या दिवशीं जयवंता-जवळच बसलेल्या इसमाला वारंवार त्याच्या तोंडून हा चरण निघालेला पाहून नवल वाटलें. शेवटीं तो म्हणाला, 'काय राव, इथें तुरुंगांतही 'हिरा' तोंडांत येते आहे! डोळ्यांची तहान शब्दांवर भागवून घेतां आहां झालें.'

'हिरा कुठली?' जयवंत आश्चर्यचकित होऊन म्हणाला.

'अगदीं नकळत्यावरच घालतां आहां. हिरा नायकिणीचें नांव माहीत नाहीं असा जुगारी इकडच्या बाजूला मिळेल तरी का?'

'खरेंच मला माहीत नाहीं ती.'

'मग फुकट जुगारांत पैसे कमावलेत न् गमावलेत! काय मारू पांखरूं आहे म्हणतां! गाल म्हणजे पिका कलमी आंबा. रंग कसा गिनीसारखा. डोळ्यांतली जादू तर! अहो एका महिन्यासाठीं मी पांचशें रुपये ओतले आहेत ना तिच्या पायांवर!'

धडधडणारें हृदय दोन्ही हातांनीं दाबून धरून जयवंत म्हणाला, "गोव्यांतलीच आहे वाटतं बाई ही?"

"गोव्यांतली? अहो या बाबतींत गोव्याचें एकदां नांव झालें आहे एवढेंच. गोव्यांतल्या नायकिणी हिच्या मोलकरणीदेखील शोभणार

नाहींत. गेल्या सहा सात महिन्यांत दहा हजारावर कमाई केली आहे तिनें, राव."

"इकडलीच कुठली आहे वाटतें?" जयवंताच्या कोरड्या जिभेनें प्रश्न विचारला.

"आरवंद्याकडलीच आहे. तिची हकिगत तर फारच मजेदार आहे बुवा. पहिल्या दिवशीं पापाला भिऊन हिनें म्हणे विहिरींत उडी टाकली होती. आतां मात्र महिना न् यजमान बरोबर बदलत आहेत. नुसता लिलांव चालविला आहे बेटीनें. हो, तिनें तरी कां कमाई करूं नये म्हणा. लोकांच्या नुसत्या उड्या पडताहेत. कुठें मोलकरीण राहिली असती तर महिना पांच रुपये कुणी दिले नसते. पण आज दिवसाला पंचवीस रुपये लोळण घेताहेत. काय एकेका बाईचें भाग्य असतें बघा."

हें रसभरित व्याख्यान ऐकतां ऐकतां जयवंतानें आपलें तोंड झांकून घेतलें होतें. पण तें त्याच्या सोबत्याच्या लक्षांत आलें नव्हतें. त्याच्याकडे लक्ष जातांच तो म्हणाला,

"नुसतें वर्णन ऐकून घायाळ झालां वाटतें? मग उद्यां सकाळीं पहाल तर प्राणच सोडाल!"

आपल्याविरुद्ध चाललेलें संभाषण चोरून ऐकण्याचा मोह जसा आवरत नाहीं त्याप्रमाणें ही हिरा नायकीण आपली बहीणच आहे असें वाटून हृदयाला वृश्चिकदंशाच्या वेदना होत असतांनाही हिरा नायकीण दाखविण्याविषयीं सोबत्याला विनंती करण्याचा मोह जयवंताला आवरला नाहीं.

"अलीकडे दोन दिवस तर आपण तिच्या घरावरूनच कामाला जातों. तुम्ही खालीं पहात जातां म्हणून ती तुम्हांला दिसली नाहीं. अहो, देवानें रत्नें वर आणि खालीं दगड ठेवले आहेत. म्हणून माणसानें नेहमीं वर बघत चालावें."

सोबत्याचें हें उत्तर ऐकल्यापासून जयवंताच्या डोळ्यांपुढें हिरा नाचूं लागली. तिचे डोळे हरिणासारखे तेजस्वी, निष्पाप व सुंदर राहिले असतील का? तिचें मन या घाणींतून सुटण्यासाठीं धडपडत असेल

का ? भलभलत्या विचारांनीं त्याच्या डोक्यांत एवढा-गोंधळ माजविला कीं, आपण वेडे तर झालों नाहीं ना अशी त्याची त्यालाच शंका आली. कैदी कामावर निघाले तेव्हां त्याचा चेहरा पांढरा फटफटीत पडला होता. शिपायाच्या लक्षांत ही गोष्ट आली व तो म्हणाला, 'नंबर १५, तूं आजारी बिजारी आहेस काय ? तसें असलें तर डॉक्टरसाहेबांकडे चल. डॉक्टरसाहेबांनीं आजारी ठरविलें तर दोन दिवस काम तरी चुकवितां येईल.' जयवंतानें आपण आजारी नाहीं असें सुचविलें. दवाखान्याला वळसा घालून कैदी थोडे पुढें गेले तोंच जयवंताच्या कानांवर त्याच्या सोबत्याचे शब्द पडले. 'ती उजव्या हाताची हिरवी माडी बघ. उघडीच दिसते आहे खिडकी.' अजून घर यावयाचें होतें. पण जयवंत निश्चल नजरेनें पाहूं लागला. याच वेळीं थुंकण्यासाटीं कोणीतरी गृहस्थ त्या माडीपुढील गच्चीवर आला. पांढरे केंस, सुरकुतलेला चेहरा, पोंक आलेली पाठ, असें तें ध्यान होतें. पुन्हां जयवंताच्या कानांवर शब्द पडले, 'या थेरड्यानें गांटलीन् का हिला ! कोंकणपट्टींतील एक शिल्लक ठेवली नसेल बेट्यानें. छप्पन्न रोग आहेत स्वारीला, पैसा व रोग दोन्ही भरपूर मिळणार ××ला.' 'चूप रहा' पुढचा शिपाई मान वळवून दरडावणीच्या स्वरानें म्हणाला. हिरवी माडी जवळ येत चालली. आपल्या भोंवतालचें जग गरगर फिरत आहे असें जयवंताला वाटूं लागलें. गच्चीवरील खोकड आंत गेला होता. हळुहळु खिडकी दिसूं लागली. त्या म्हाताऱ्याच्या उजव्या हातांत कुणाचासा सोन्याचीं कांकणें असलेला हात होता. त्यानें आपला डावा हात उंच धरला होता. यावरून त्यानें तो दुसऱ्या माणसाच्या खांद्यावर टाकला होता. आतां खिडकी स्पष्ट दिसूं लागली. म्हातारा त्या स्त्रीचें चुंबन घेत होता. खिडकी आतां अगदीं समोर आली. कैद्यांच्या पायांतील बेड्यांचा आवाज ऐकून त्या स्त्रीनें झटकन् आपलें तोंड फिरविलें व ती रस्त्याकडे पाहूं लागली. जयवंतानेंही तिच्याकडे पाहिलें. तिचें शरीर पूर्वीच्या हिरेचेंच होतें. पण डोळे मात्र पूर्वीच्या हिरेचे नव्हते. हरिणीऐवजीं वाघिणीप्रमाणें तिची दृष्टि झाली होती. डोळ्यांतील अमृताची जागा दारूनें घेतली होती. जयवंताचें पाऊल पुढें पडेना. कोणी तरी आपलें हृदय करवतानें

कापीत आहे असें त्याला वाटलें. तो वेड्यासारखा ओरडला, ‘ हिरा ! ’ हिरेचें लक्ष त्याच्याकडे गेलें. जयवंत थांबल्यामुळें मागील कैदी थांबले होते. शिपाई मोठ्यानें ओरडून म्हणाला, ‘ नं. १५, चलाव. कामाची खोटी होत आहे. ’ नं. १५ च्या पायांतील बेडी वाजली नाहीं. तोंडांतून मात्र ‘ हिरा ’ एवढेच शब्द बाहेर पडले. खिडकींतील स्त्रीचा चेहरा गोरामोरा झाला होता. आपलें तोंड हातांनीं झांकून ती ओक्साबोक्शीं रडूं लागली. गरगर डोळे फिरवीत जयवंत ओरडला, ‘ हिरा, हिरा ! ’ मागील शिपाई तारस्वरानें ओरडला, ‘ नं. १५, बडबड बंद कर; नाहीं तर फटके बसतील. ’ त्याचें हें वाक्य पुरें होण्याच्या आधींच न. १५ धाडकन् रस्त्यावर पडला होता.

त्याच दिवशीं वेड्यांच्या इस्पितळांत एक इसम दाखल करण्यांत आला. त्याला नांव विचारा, गांव विचारा, वाटेल तें विचारा; तो एकच उत्तर देतो, ‘ ढेंकणाच्या संगें हिरा तो भंगला ! ’

( १९२९ )

———

# तिचे डोळे

त्या मुलीनें हळूच मान वर करून पाहिलें. माणसाचा हात दूर होतांच लाजाळूचें झाड नाहीं का मोकळेपणानें मान वर करीत ? पहायला आलेली मंडळी चहा घेऊं लागली. लगेच तिला हायसें झालें. कोर्टांत उलट तपासणी संपल्यावर माणसाला असेंच वाटत असेल, असा पुसट विचारहि तिच्या मनांत येऊन गेला. आयुष्याचा प्रवास ज्या व्यक्तीच्या सोबतीनें कदाचित् होण्याचा संभव आहे ती एकदां नीट पहावी अशी स्वाभाविक इच्छा तिच्या मनांत उत्पन्न झाली. संसार डोंगर ओलांडतांना आलेला शीण नुसत्या हंसण्यानें घालविण्याची जादू त्यांच्या अंगीं असेल का ?

आपल्याकडे कुणी पाहत नाहीं अशा खात्रीनेंच आशेनें वर पाहण्याचें धाडस केलें होतें. पण तिच्या नजरेला अनंताची नजर मिळतांच ती लाजेनें चूर होऊन गेली अगदीं. इतर मंडळी फराळावर ताव मारण्यांत दंग होऊन गेली होती. पण अनंताला आपण बशींत चहा ओतला आहे याचेंहि भान नव्हतें. त्याचें मन कुठल्यातरी यक्षसृष्टींत भ्रमण करीत असावें. हें भ्रमण चाललें असतांनाच आशेचे सुंदर डोळे त्याच्या नजरेला पडले. आतांपर्यंतच्या साऱ्या कार्यक्रमाचा मनस्वी राग आला त्याला. नांव विचारणें, वाचून घेणें, गाणें ऐकणें इत्यादि मामुली भानगडींपेक्षां माझ्या मुलीचे डोळे बघा, असेंच कां हिच्या बापानें सरळ सांगितलें नाहीं आपल्याला ?

लहानपणापासून सर्व प्रकारच्या सौंदर्याचा मोठा लोभी होता तो. वयाच्या पांचव्या वर्षी कोंकणांत आजोळीं गेला असतांना त्यानें इतक्या सुंदर शिंपा गोळा केल्या होत्या कीं कुठल्याहि लहान मुलीला बाहुलीच्या लग्नांत तीं ताटें वापरण्याचाच मोह व्हावा ! त्याच्या कुठल्याहि पुस्तकांत

मोरपीस नाहीं असें कधींच झालें नाहीं ! त्याच्या घरापासून खूप दूर असलेल्या एका पारिजातकाचीं परडीभर फुलें तो लहानपणीं नित्यनेमानें सकाळीं वेंचून आणी. त्याच्या आजीला वाटे आपला नातू पुढें मोठा देवभक्त होणार. चिमुकल्या अनंताला पांढऱ्या शुभ्र अंगाच्या पण तांबूस देठांच्या फुलांचा तो सडा पाहून आकाशांतल्या चांदण्या लुटायला मिळाल्याचा आनंद होई याची तिला कल्पनाच नव्हती. कॉलेजांत असतांना साध्या बांधणीऐवजीं सुंदर बांधणीचें एक पुस्तक घेण्याकरितां त्यानें उपास केला होता आणि भलत्याच दिवशीं आपली एकादशी असल्याचें त्यानें सांगितल्यामुळें त्याची मित्रमंडळी पुढें कित्येक दिवस 'पुंडलीक वर दे हरि विठ्ठल' या जयघोषानेंच त्याचें स्वागत करीत असत.

यामुळें आशेचे मोहक डोळे पाहतांच ज्या यक्षसृष्टींत आपण फिरत होतों तेथील अधिदेवता असलेल्या अप्सरेचें आपल्याला दर्शन झालें असेंच त्याला वाटलें. तिच्या एका डोळयांत आकाशांतील नीलिमा तारकांचें तेज घेऊन नाचत होता तर दुसऱ्यांत सागरांतील नीलिमा रत्नांच्या तेजानें तळपत होता. त्या रमणीय सौंदर्याचा आनंद त्याच्या मुद्रेवर स्पष्टपणें उमटला.

आशा उठून आंत गेली. तिच्या बापानें प्रश्नार्थक दृष्टीनें अनंताकडे पाहिलें. होकार येणार अशीं लक्षणें अनंताच्या मुद्रेवरून दिसत होतीं. पण त्याच्या तोंडांतून शब्द आले, 'विचार करून कळवितों.' बिचारा गरीब मुलीचा बाप ! आयुष्यांच्या वर्तमानपत्रांत कायम ठशाचा हा मजकूर वाचायची त्याला संवयच होऊन गेली होती हल्लीं.

त्या दिवशीं रात्रीं अनंताचा मात्र डोळयाला डोळा लागला नाहीं. पावसाळयाच्या आरंभीं रायांरायांतून काजव्यांचे थवे जसे चमकतात, त्याप्रमाणें त्याच्या डोक्यांतील निरनिराळया विचारांत आशेचे डोळे एकसारखे हंसत नाचत होते. त्याला वाटलें आपण झटक्यासरशीं हो म्हणून आलों असतों तर फार बरें झालें असतें. एवढे सुंदर डोळे नुसते पाहण्यासाठीं आपण वाटेल तिथें आनंदानें गेलों असतों. मग ते आपले होण्याची आलेली ही सोन्यासारखी संधि–

पण लोखंडाचें सोनें करणारा परिस जिथें असेल तिथें सोन्याचें लोखंड करणारा उलटा परिसहि असेलच कीं! निदान अनंताच्या मनांत तरी तो होता. सुंदर वस्तूंविषयींची विलक्षण ओढ त्याच्या मनाला जशी लागे, त्याप्रमाणें त्या सौंदर्याच्या नाशाचा विचारहि त्याला बेचैन करून टाकी. लहानपणीं आजीकरितां आणलेल्या पारिजातकाच्या फुलांपैकीं एक त्यानें वासाकरितां घेतलें होतें. दुसऱ्या कसल्याशा नादांत तें फूल त्यानें हातांत गच्च धरून ठेविलें. थोड्या वेळानें त्याला फुलाची आठवण झाली. मूठ उघडून त्यानें पाहिलें तों काय? काळवंडून जाऊन मलूल झालेलें फूल! तें पाहून आपल्या डोळयांत उभे राहिलेले अश्रू त्याला अजूनहि आठवत.....

त्या फुलासारखीच दुसरी एक गोष्ट तो विसरला नव्हता. त्याचा एक लंगोटियार दोस्त एके दिवशीं मोठी जम्मत दाखविण्याकरितां म्हणून त्याला आपल्या घरीं घेऊन गेला. त्यानें पंचवीस तीस आगकाड्यांच्या पेट्या काढल्या. अनंताला वाटलें हा आतां त्याची भली मोठी मालगाडी करणार. पण आपल्या मालगाडीचा विस्तार दाखविण्यापेक्षां डब्यांतील मालाचें प्रदर्शन उघडण्यालाच तो अधिक उत्सुक होता. त्यानें एक एक आगपेटी उघडायला सुरवात केली मात्र! अनंताचें अंग अगदीं शहारून गेलें. पहिल्या पेटींत एक सुंदर काळें फुलपांखरू—गणपति म्हणत असे अनंत त्याला—दोऱ्यानें बांधल्यामुळें निपचित पडलें होतें. दुसऱ्या पेटींतलें पिवळें फुलपांखरू—त्याच्या अंगावरील बारीक ठिपके किती मोहक होते—पण तेंहि नांवालाच जिवंत होतें. ह्या सर्व पेट्यांचें परीक्षण होण्याच्या आधींच अनंतानें त्यांतील एका फुलपांखराला बंधमुक्त केलें. कैदी पळवून नेणाऱ्या मनुष्याप्रमाणें अनंताची स्थिति झाली त्याची व त्याच्या बाळमित्राची अशी खडाजंगी उडाली कीं पुढें सहा महिने ते रस्त्यांतून जातांना एकमेकांकडे ढुंकूनहि पाहत नसत.

लहानपणींच झालेल्या देवी आघातांनीं अनंताचा हा हळवेपणा अगदीं पराकाष्ठेला जाऊन पोंहचला. वडिलांवर त्याचें फार प्रेम होतें.

पण गाडींतून पडल्याचें निमित्त होऊन त्यांनीं जें अंथरूण धरलें तें अगदीं मृत्यूचें बोलावणें येईपर्यंत! त्याची एकुलती एक लाडकी बहीण थंडीच्या दिवसांत न्हाणीच्या चुलीपाशीं बसली असतांना तिची जी साडी पेटली ती चिताच ठरली. तिच्या फोटोकडे पाहण्याचासुद्धां अनंताला धीर होत नसे. फोटो पाहतां पाहतां भाजल्यानंतरचें तिचें विव्हळणें त्याच्या कानांत घुमूं लागे.

जीवनाची काळी बाजूच चटकन् त्याला दिसे. या हळवेपणाचा परिणाम त्याच्या आयुष्यावरहि झाला. त्याच्या कॉलेजचा खर्च चालविणाऱ्या मामाचें मत त्यानें डॉक्टर, इंजिनिअर निदान वकील व्हावें असें होतें.पण डॉक्टर झाल्यावर अज्ञानानें आपल्या हातून एखाद्याचा प्राण जाईल, इंजिनिअर झाल्यावर आपणांला धोक्याच्या जागीं मजुरांना चढवावें अगर उतरवावें लागेल आणि वकिली करतांना प्रसंगीं खुनाची अगर फांशीची तरफदारी करणें भाग पडेल अशा कल्पनांनीं व्याकुळ होऊन त्यानें ते सर्व मार्ग सोडून दिले. एम्. ए. होतांच तो सरळ शिक्षक बनला. बुद्धाच्याप्रमाणें त्याचाहि हा एक प्रकारचा संन्यासच होता.

आपली हळवी मनोवृत्ति फारशी चांगली नव्हे हें त्याला मधून मधून कळे. पण कांहीं केल्या तें त्याला वळेना. बुद्धिवाद म्हणजे स्पष्ट मार्ग दाखविणारा विजेचा दिवा खरा! पण आंधळ्या भावनेला तो दिसायचा कसा?

परंतु वस्तु कितीहि हलकी असली तरी पृथ्वीच्या आकर्षणांतून ती सुटत नाहीं. आशेच्या सुंदर डोळ्यांच्या भवितव्याच्या भीतीनें विचार करणारें त्याचें हळवें हृदयहि शेवटीं कटाक्षजालांत सांपडलेंच!

+ + +

अनेकदां आपल्या डोळ्यांकडे पाहात असलेल्या अनंताला आशा पकडत असे. ती हंसत हंसत विचारी—

"वेड लागलंय वाटतं हल्लीं?"

"नाहीं कोण म्हणतो?"

"कशाच ? माझं ?"

"तुझं नाहीं."

"अस्सं ! दुसरीशीं तुलना करण्याकरतांच इतकं निरखून पाहणं होतं माझ्याकडे ! होय ना ?"

"तसं नव्हे ग !"

"मग कसं हो ?"

आशेच्या या तालबद्ध प्रश्नावर खूप हंसून अनंत उत्तर देइ, "तुझ्या डोळयांनीं वेड लावलंय मला."

"असं काय भरलंय त्यांच्यांत ? फार तर पाणी असेल थोडं."

"पाण्यानं कांहीं धुंद होत नाहीं मनुष्य !"

आशेला यावेळीं हंसू आवरणें अशक्य होई. मग अनंत गंभीरपणानें म्हणे "आशा, तूं फूल आहेस आणि तुझे डोळे हा त्या फुलाचा सुवास आहे."

मात्र रात्रीं आशा निजली कीं तिच्या मिटलेल्या डोळयांकडे पाहून नाहीं नाहीं ते विचार अनंताच्या मनांत येत. संध्याकाळीं मिटलेलीं सारीं फुलें दुसरे दिवशीं सकाळीं उमलतात कीं अफाट वनस्पतिसृष्टींत या नियमाला कांहीं अपवादहि आहेत ? त्याच्या या विचित्र किंबहुना विकृत विचारांनीं एके दिवशीं शाळेंतच उचल खाल्ली. इंग्रजी निबंधाकरितां तो बुद्धाचें चरित्र मुलांना सांगत होता. रोगी मनुष्य आणि प्रेत पाहून बुद्धाला आलेलें वैराग्य—मास्तर एकदम थांबून शून्यदृष्टीनें काय पाहत आहेत हें त्या वर्गांतील मुलांना कधींच कळलें नाहीं. पण बुद्धाच्या वैराग्याबरोबर अनंताला आशेच्या डोळयांची आठवण झाली होती !

त्या दिवशीं त्याला घरीं येण्याची भीतिच वाटूं लागली थोडी ! आशेचे मोहक डोळे आणि बुद्धाची वैराग्याची कथा ! शाळेंतून परस्पर तो लांब फिरायला गेला. येतांना वाटेवरल्या देवळांत सहज शिरला तो ! देवळांतल्या सभामंडपावरील कठडयांत राहणारीं सुंदर कबुतरें पाहण्यांत त्याला नेहमींच आनंद वाटे. विविध रंगांच्या घुमणाऱ्या कबुतरांकडे तो

पहात असतांनाच एका मुलानें वर चढून हळूच एक कबुतर पकडलें. तो खालीं उतरला. अनंतानें वळून पाहिलें. पलीकडे उभ्या असलेल्या एका म्हाताऱ्या बाईनें तें घेतलें व घट्ट धरलें. कबूतराचें मंद आक्रंदन व त्याची फडफड अनंताला ऐकवेना. तो जरा रागानेंच म्हणाला,

"बाई, जाऊं दे तें गरीब पांखरूं."

तारवटलेल्या डोळयांनीं त्याच्याकडे पहात म्हातारी म्हणाली, "नी माझ्या मुलाला काय तूं करणार आहेस बरा?" त्या म्हातारीचा एकुलता एक मिळविता मुलगा संधिवातानें अंथरुणाला खिळला असून त्याच्याकरितां हें कबुतर ती बाई नेत आहे असें अनंताला शेवटीं कळलें. त्या कबुतराची धडपड हा आपल्या धडधडणाऱ्या हृदयाचाच प्रतिध्वनि आहे असें त्याला क्षणभर वाटलें.पण दुसऱ्याच क्षणीं त्याच्या उदास मनाला आनंद झाला. आयुष्यांत कठिण प्रश्न प्रत्येकालाच सोडवावे लागतात. मग तो राजपुत्र सिद्धार्थ असो नाहींतर मोलमजुरी करणारी म्हातारी असो. म्हातारीचें उत्तर बुद्धाच्यापेक्षां अगदीं निराळें होतें. कुणी सांगावें? तेंच कदाचित् बरोबर असेल !

\+ + +

आपला विचित्र हळवेपणा उसळून वर येत आहे असें वाटतांच अनंत त्या म्हातारीविषयीं मनांत विचार करूं लागे. कांहीं दिवस हा तोडगा उपयोगीं पडला. पण या मंत्रापेक्षां भूतच अधिक जबरदस्त आहे असें शेवटीं त्याला आढळून आलें. आशेला दिवस गेल्याचें समजतांक्षणीं त्याला अत्यानंद झाला होता यांत संशय नाहीं. पण पुढें तिच्या ओकाऱ्या त्याला पाहवेनाशा झाल्या. तिची अन्नावरली वासना उडून जावी आणि आपण मात्र पूर्वीप्रमाणें मनमुराद खात रहावें, हें त्याला कसेंसेंच वाटूं लागलें. मधूनमधून आशा अस्वस्थ झाली कीं अनंताची मुद्रा एखाद्या गुन्हेगाराप्रमाणें दीनवाणी होई !

आणि त्याच्या या दुःखावर कळस चढविला आशेच्या डोळयांनीं. स्वच्छ झऱ्याचे पाणी गढूळ व्हावें तसें ते दिसूं लागले. त्यांच्या भोंव-

तालचीं तीं काळीं वर्तुळें–आपल्या आवडत्या सौंदर्याचा नाश जवळ आला अशी अनंताची खात्री होऊन चुकली.

आशेची सुखरूप मुटका झाली. अनंतानें मुलगी हातांत घेतली तेव्हां अनपेक्षित खेळणें मिळतांच लहान मुलाला जो आनंद होतो तो त्याच्या चेहऱ्यावर नाचत होता. पण मुलगी आशेच्या हातांत परत देतांना त्यानें तिच्या डोळ्यांकडे पाहिलें. ते निस्तेज दिसत होते. कां कुणाला ठाऊक, आपल्या मुलाकरितां धरून नेलेल्या त्या सुंदर कबुतराची अनंताला आठवण झाली. प्रसूतिगृहांत तो दहा दिवस नेमानें जाई, मुलीला घेई, आणि आशेशीं इकडच्या तिकडच्या गप्पाही मारी. पण पायांत कांटा मोडला असूनहि शिपायानें कवायतींत व्यवस्थित धांवावें अशांतलाच तो प्रकार होता.

आशा घरीं आली. बारशाची तयारी झाली. मुलीच्या नांवाच्या निमित्तानें नवराबायकोनीं आधुनिक नाटक–कादंबऱ्यांतील नायिकांचीं नांवें तपासून पाहिलीं. पण दोघांचें कांहीं केल्या एकमत होईना. शेवटीं दोघांनीं दोन नांवाच्या चिठ्या टाकून त्यातील एक काढायची असें ठरलें. आशा चिठ्या लिहूं लागली. अनंतानें मुलीला घेतलें. तिच्या डोळ्यांकडे त्यानें निरखून पाहिलें मात्र ! त्याचें आश्चर्य प्रतिक्षणीं वाढूं लागलें. तो आशेजवळ येऊन म्हणाला " तू बारा दिवसांची होतीस तेव्हां कशी दिसत असशील ? "

" इश्श ! "

" अश्शी ! या लबाड पोरीचे डोळे तरी बघ." आनंदानें अनंत उद्गारला–बुद्ध जर या घटकेला असता तर त्याच्या तत्त्वज्ञानाचें खंडन करणारे हे इवले डोळे पाहण्याला आपण अवश्य निमंत्रण दिलें असतें असेंहि त्याच्या मनांत आल्यावांचून राहिलें नाहीं. तो हातांतल्या तान्ह्या मुलीचे पटापट मुके घेऊं लागला.

त्याच्या हातांतून मुलगी घेण्याकरितां हात पुढें करीत आशा म्हणाली " आतां दुसरं वेड लागलं वाटतं हें ? "

"छे! पहिलंच आहे हें! तिचे डोळे थेट तुझ्यासारखे आहेत अगदीं!"

"माझ्यासारखे?"

हो म्हणण्याकरितां अनंतानें आशेकडे पाहिलें. पण त्याला तिच्या डोळ्यांत निराळाच मोहकपणा दिसला. हातांतील मुलीकडे ती वात्सल्यानें पाहत होती. समुद्रांतलीं रत्नें नाहींशीं होऊन तिथें लक्ष्मी दिसावी किंवा आकाशांतल्या तारकांचें तेज लोप पावून तिथें चांदणें फुलावें तसें अनंताला वाटलें!

—आशेला पहिल्यांदाच पाहत असल्याप्रमाणें अनंत आनंदानें उद्गारला,

"डोळ्यांत अनंत प्रकार आहेत हेंच खरें."

———

(१९३६)

# करुण-कथा

" ऐकलं का—? "

विठ्ठलरावांनीं ऐकलें—पण ऐकलें नाहीं! लिहितांना लेखकाची कशी समाधि लागली पाहिजे असें त्यांनीं कुठेंसें वाचलें होतें; मग पत्नीचा प्रश्न त्यांना ऐकूं यावा कसा? तसें म्हटलें तर त्यांची समाधि होती लुट्टूपुट्टूचीच; पण जगांत खोट्या गोष्टी देखील खऱ्या म्हणून चालत नाहींत कां? साक्षी, सबब्री आणि साधु यांत खऱ्यापेक्षां खोट्या-चाच भरणा अधिक आढळतो.

" म्हटलं, ऐकलं कां? " जरा वरचा सूर लावून रखमाबाई म्हणाल्या. ' कान कांहीं फुटले नाहींत माझे ' असें उत्तर विठ्ठलरावांच्या जिभेच्या शेंड्यावर आलें; पण जोत्यावरून खालीं पडणाऱ्या अवखळ मुलाला आईनें धांवून मागें घ्यावें त्याप्रमाणें मोठ्या मनोनिग्रहानें त्यांनीं तें आंवरलें. या त्रासामुळें आपली समाधि सविकल्प झाली असें मात्र त्यांना वाटूं लागलें. वाङ्मयाचा सविकल्प समाधीशीं कसला तरी संबंध आहे असें त्यांच्या वाचनांत नुकतेंच आलें होतें! यामुळें पत्नीशीं एक अक्षरदेखील न बोलतां हातांतील फाउण्टन—पेन कागदावर हाल-वीत ते विचार करूं लागले.

ही समाधि पाहून तिची पूजा करण्याची बुद्धि रखमाबाईंना व्हावी यांत नवल तें काय? आधींच स्त्रिया भाविक! त्यांत रखमाबाई म्हणजे अगदीं अस्सल आर्य स्त्री! उखाण्याखेरीज नवऱ्याचें नांव लग्न झाल्यापसून गेल्या दहा वर्षांत तिनें कधींच घेतलें नव्हतें! पंचमांतल्या आवाजाचाही उपयोग होत नाहीं असें पाहून तिनें सप्तमांत प्रवेश केला.

" म्हटलं—सोन्याचीं फुलं पाहिलीं का हीं? उभ्या जगांत नाहीं पहायला मिळणार असली जोडी!"

उष्णतेनें वितळत नाहीं असा जगांत कोणता पदार्थ आहे? फरक काय तो उष्णतेच्या प्रमाणाचा. रखमाबाईच्या या शेवटच्या वाक्यानें विठ्ठलरावांची समाधि साफ उतरली. ते रागारागानें म्हणाले, "खरंच, जगांत पहायला मिळणार नाहीं असली जोडी!"

"खरं ना?" रखमाबाईनीं आपला स्वर खालावून विचारलें. बायकांचा कंठ उपजतच गायकासारखा असतो. वरच्या स्वरांतून त्या क्षणार्धांत अगदीं खालीं येऊं शकतात.

"अगदीं खरं!" विठ्ठलराव संतापून म्हणाले, "तुझ्यामाझ्या-सारखी नवरा—बायकोची जोडी उभ्या जगांत नाहीं मिळायची कुठं!"

"झालं काय मेलं असं डोक्यांत राख घालायला?"

"तुझ्यासारखी आग आहे ना डोक्यावर येऊन बसलेली!"

आतां मात्र रखमाबाईना राग आंवरेना. ज्वालामुखीचा स्फोट होतांच त्याच्यावरल्या हिरवळीचा मागमूससुद्धां नाहींसा होतो. रखमा-बाईचेंही तसेंच झालें. त्या संतापानें म्हणाल्या, "उठल्या सुटल्या मेलं चिडणं आणि रडणं. कधीं सुखाचा शब्द! शेजार—घरच्या त्या पाहु-णीचीं फुलं दाखवायला आणलीं—म्हटलं आवडतील इकडे—नी—"

"आवडतील इकडं—!" वेडावीत विठ्ठलराव उद्गारले, "ठाऊक आहे इकडच्या आवडीची किमत तिकडं काय आहे ती! भलत्या वेळीं भलत्या गोष्टी! कशी चांगली जुळत होती गोष्ट मनांत; पण तुला काय त्याचं? आम्हीं मेहनत करून गुलाब वाढवावा आणि वानरानें तो ओरबाडून टाकावा!"

आपला नवरा पडला लेखक! त्याची उपमा चुकीची ठरूं नये म्हणूनच कीं काय, वानरासारख्या वाकोल्या दाखवीत रखमाबाई तिथून निघून गेल्या. विठ्ठलराव पुन्हां समाधि लावण्याचा विचार करूं लागले. त्यांच्या डोळयांपुढें पांचशें रुपयांचें बक्षीस नाचत होतें. एका प्रसिद्ध मासिकानें करुणरसप्रधान सर्वोत्कृष्ट गोष्टीला तें बक्षीस देण्याचें जाहीर

केलें होतें. अलीकडे विठ्ठलराव त्या गोष्टीची जुळवाजुळव करण्याच्या नादांत असत. पण लहान मुलाच्या हातांत नुसती पाटी–पेन्सील दिली म्हणून त्याला लिहितां येतें थोडेंच! त्याच्या पाटी-वर वेड्यावांकड्या रेघोट्याखेरीज जसें दुसरें कांहीं दिसायचें नाहीं, त्याप्रमाणें विठ्ठलरावांच्या मनांतही असंबद्ध कल्पनांखेरीज अजून दुसरें कांहींच जमा झालें नव्हतें. आज गोष्टीला सुरवात करायचीच अशा निर्धारानें ते बसले होते– पण म्हणतात ना, कुऱ्हाडीचा दांडा गोताला काळ! रखमाबाई तीं फुलें घेऊन आल्या अन्–

कथा करुणरसप्रधान व्हायला हवी! करुणा–दया–दया धरमका मूल है! आपण धार्मिक आहों, याबद्दल विठ्ठलरावांना कधींच संशय नव्हता. आईबापांचें श्राद्ध–पक्ष करण्याच्या कामीं त्यांनीं एकदांसुद्धां चुकारतट्टूपणा दाखविला नव्हता! विठ्ठलराव गोष्टीचा विचार करूं लागले. संन्याशाच्या लग्नाला शेंडीपासून तयारी! कुणावर बरें गोष्ट लिहावी? कोंपऱ्यावरला मलूल चेहऱ्याचा इराणी–किती दुःखी दिसतो तो! त्याचें दुःख जर आपण शोधून काढलें– ‘ साध्याही विषयांत आशय कधीं मोठा किती आढळे ’. वर्तमानपत्र विकणारीं पोरें–दूध घालणारे भय्ये–‘ दो आना कोइबी चीज ’ असा आक्रोश करीत जाणारे फेरी-वाले–अनेक दीन–दुःखी लोक विठ्ठलरावांच्या डोळयांपुढें उभे राहिले; पण गोष्ट कांहीं केल्या जमेना. समोर पडलेलें वर्तमानपत्र त्यांनीं सहज उचललें. त्यांची दृष्टि खालील मजकुरावर अगदीं खिळून गेली–

> “ शहरांतल्या लोकांना खेड्यांतलीं दुःखें कशीं कळ-णार? भारतभूमीचें खरें हृदय–दुःखानें गांजलेलें, दारिद्र्यानें तळमळणारें आणि आशेनें तडफडणारें हृदय–खेड्यांतच आढळेल. थोर थोर पुढारी खेड्याकडे चला असा उपदेश करीत आहेत, याचें रहस्य हेंच आहे. मुंबई-सारख्या शहरांत तुम्हांला देशाचा शृंगार आढळेल; पण देशाचें कारुण्य–तें कारुण्य पहायचें असेल तर खेडे-गांवांतच गेलें पाहिजे. ”

विठ्ठलरावांनीं तत्काळ निश्चय केला. खेडेगांवांत जायचें आणि तिथला अनुभव घेऊन अशी हृदयद्रावक करुणकथा लिहायची कीं–

कोंकणांतल्या एका खेडेगांवीं त्यांचे मेव्हणे डॉक्टर होते. 'उद्यांच्या बोटीनें तुमच्याकडे येत आहों' अशी त्यांना तार करून विठ्ठलराव बांधाबांध करूं लागले. आपल्या माहेराविषयीं प्रेमाचा पान्हा पतिराजांना आजच कां फुटला, हें रखमाबाईंना कांहीं केल्या कळेना. पण विद्यार्थ्याला सुट्टी आणि बायकांना माहेर कधीं नकोसें झालें आहे का?

दुसऱ्या दिवशीं बोटींत वरच्या वर्गांत विठ्ठलराव रखमाबाईंसह प्रवेश करते झाले. सामान आणणारा हमाल त्यांच्याकडे अधिक पैसे मागूं लागला–"रावसाब, गरीबाचीं पोरं दुवा देतील तुम्हांला-चहा-पाण्याला द्या कीं कांहीं–"

"तूं चहा पितोस? बाबा, चहा फार वाईट आहे प्रकृतीला!"

"फाटके कपडे घालतुंया रावसाब–"

"तुझ्या अंगावर कपडे तरी आहेत. अरे, महात्मा गांधी नुसता पंचा नेसून रहातात–पंचा!"

बिचारा हमाल हिरमुसला होऊन गेला. रखमाबाईंना पति-राजांच्या व्यवहारदक्षतेचें कौतुक वाटलें आणि विठ्ठलराव आपल्या करुण-कथेचा विषय शोधण्यांत दंग होऊन गेले. थोड्या वेळानें तिकडची नजर एका सुंदर बाईवर खिळली आहे हें रखमाबाईंच्या लक्षांत आलें. त्या फणकाऱ्यानें म्हणाल्या, "इश्श. तिकडं काय मेलं हें पाह्यचं असं सारखं? मनाची नसली तरी जनाची–"

विठ्ठलराव शुद्धीवर येऊन म्हणाले, "अग, सूक्ष्म निरीक्षण करीत होतों मी गोष्टीसाठीं. तुम्ही बायका म्हणजे–"

"हो–हो-आणि पुरुष म्हणजे–थंडी वाजतेय् मला. तेवढा रग तरी काढून द्यावा बिछान्यांतला."

वाघाच्यासारखे पट्टे असलेला रंग विठ्ठलरावांनीं काढला व तो रखमाबाईच्या अंगावर घालीत ते पुटपुटले, "आतां कशी वाघीण छान शोभायला लागली!"

रखमाबाई गुरगुरल्या मात्र. आपली उपमा समर्पक असल्याची विठ्ठलरावांना खात्री पटली.

+ + +

मेव्हण्याच्या घरीं पाऊल टाकल्याबरोबर विठ्ठलरावांनीं करुण-कथेकरितां निरीक्षणाला प्रारंभ केला. त्यांच्या घरासमोरल्या माडांच्या बागांत एक बैल जमिनीवर बसला होता. पुढ्यांत टाकलेल्या गवताला त्यानें तोंडदेखील लावलें नव्हतें. विठ्ठलरावांना मोठें आश्चर्य वाटलें. बैलाजवळ जाऊन त्यांनीं पाहिलें. त्या बिचाऱ्यानें मुळींच हालचाल केली नाहीं. "आजारी आहे वाटतें बैल?" त्यांनीं जवळून जाणाऱ्या एका माणसाला प्रश्न केला. त्या मनुष्याच्या कोंकणी बोल-ण्यांतून विठ्ठलरावांना एवढाच अर्थबोध झाला कीं, त्या बैलाला त्याच्या जोडीदाराबरोबर आंबोलीला राखणीला ठेवलें होतें. तिथें ते दोघे चरत असतांना एका वाघानें त्याच्याबरोबरच्या बैलाला ठार मारलें. याला इथें आणलें तरी अजून हा फिरत नाहीं कीं चरत नाहीं!

विठ्ठलराव करुणकथेला विषय सांपडला अशा आनंदानें घरीं परत आले. अहाहा! केवढं हें पशूचं प्रेम! बरोबरचा बैल मेला म्हणून या बैलानें खाणें–पिणेंसुद्धां सोडलें. या विषयावरील गोष्ट जितकी करुण तितकीच उपदेशपर होईल. एकमेकांशीं भांडणारे दोन भाऊ दाखवावेत, त्यांच्याच घरांत ही बैलांची जोडी आहे असें चित्र रेखाटावें. या बैलांचें प्रेम पांहून त्या भांडणाऱ्या भावांना उपरति होते असा गोष्टीचा शेवट करावा–टिपें गळतील अगदीं लोकांच्या डोळयांतून या करुणकथानकानें! त्यांना इतका आनंद झाला कीं, तो त्यांच्या पोटांत मावेना. बोट लागल्यामुळें रखमाबाई रग पांघरून निजल्या होत्या तिथें ते गेले व म्हणाले, "अग, बैल पाहिलास का तो?"

पांघरुणांत गुरफटलेलें डोकें वर न करतां त्या म्हणाल्या, "पाहिला बैल. बैल पहायला कांहीं मुंबई सोडून कोंकणांत यावं लागत नाहीं!"

'अरसिकेषु कवित्वनिवेदनम्' ही ओळ विठ्ठलरावांना आठवली. तथापि ते चिकाटीनें बायकोला म्हणाले, "किती प्रेमळ बैल आहे पहा."

"माणसं तेवढीं प्रेमळ होतील तर–मला वाजतेय् थंडी!"

बायकोनें यःकश्चित् गोष्टींत देखील आपलें ऐकूं नये, याचा विठ्ठलरावांना राग आला. सासुरवाडीला बायकोकडून अपमान करून घेण्याइतके ते कच्चा गुरूचे चेले नव्हते! त्यांनीं रखमाबाईंना दम भरला आणि त्या बिचाऱ्या रग पांघरूनच विठ्ठलरावांच्या बरोबर बैल पहायला गेल्या.

"बघ, कसा स्वस्थ बसला आहे तो. अगदीं इकडची मान तिकडे करीत नाहीं. आपल्या सोबत्याला वाघानें मारलें, हें याच्या जिवाला इतकें लागलें कीं–"

रखमाबाई कौतुकानें बैलापुढें जाऊन उभ्या राहिल्या. बैलानें त्यांच्याकडे पाहिल मात्र–तो उठून उभा राहिला आणि त्यानें रखमाबाईंच्यावर आपलीं शिंगें रोखलीं. बैलाचा हा नवा अवतार पाहून विठ्ठलरावही दिङ्मूढ झाले. त्यांनीं सहकुटुंब घराकडे पळ काढला; पण बैलानें तिथपर्यंत त्यांची पाठ पुरवली. त्यांचे मेहुणे दुर्दैवानें या चमत्काराच्या वेळींच घरीं आले. ते हंसत हंसत म्हणाले, "अहो, झालं काय असं?"

"बरोबरच्या बैलाची हाय खाऊन खाणंपिणंसुद्धां सोडून दिलं होतं म्हणे या बैलानं–फार प्रेमळ बैल म्हणून हिला दाखवायला–"

"चांगलं प्रेम दाखिवलन् त्यानं तुम्हांला. अहो, वाघाला भिऊन हाय खाल्ली आहे त्या बैलानं! ताईच्या रगावर वाघाचे पट्टे पाहिले त्यानें आणि उठला झालं बिचारा जिवाच्या आकांताला. ही प्रीति नाहीं विठ्ठलराव! ही भीति आहे भीति!"

विठ्ठलरावांच्या पापण्यांच्या कडा किंचित् ओलसर झाल्या. आपल्या करुणकथेचा गर्भवासांतील हा मृत्यु पाहून त्यांचें मन खिन्न

होऊन गेलें. दुखांत सुख एवढेंच कीं, त्या प्रेमळ बैलानें रखमाबाईंना कांहीं इजा केली नव्हती. नाहींतर–

\+ + +

दोन दिवसांनीं तो बैल इकडे तिकडे फिरूं लागला. मधल्या उपोषणाचें पारणें फेडण्याचा त्यानें अगदीं निश्चय केला; पण आपली करुणकथा काल्पनिक ठरली म्हणून विठ्ठलराव डगमगले नाहींत. "बैलच तो बोलूनचालून; त्याला कसली आली आहे दया न् माया ?" असा शेरा ठोकून त्यांनीं पशुसृष्टीची आपल्या तरल डोक्यांतून हकालपट्टी केली.

डॉक्टरांच्या घरासमोरच एक टेंकडी होती. सकाळपासून संध्याकाळपर्यंत लोक तिचा निरनिराळ्या कारणांसाठीं उपयोग करीत असत. कथेच्या चिंतनाला आवश्यक असलेला एकान्त विठ्ठलरावांना या टेंकडीवर मिळूं लागला. तेथून भोंवतालची सृष्टि पाहून त्यांना वाटे, करुणकथेला किती अनुकूल पार्श्वभूमि आहे ही ! टेंकडीवरून दिसणारीं हजारों नारळीचीं झाडें त्यांना इतकीं निश्चल दिसत कीं, जणूं काय तीं एखाद्या तीव्र दुःखानें बेशुद्धच पडलीं आहेत ! समोरून ऐकूं येणारा समुद्राच्या लाटांचा खळखळाट ! तो ऐकून कुणीतरी ऊर पिटून आक्रोश करीत आहे, असा विठ्ठलरावांना भास होई.–पण नुसती पार्श्वभूमि घेऊन काय चाटायची आहे ? बोहलें, मुहूर्त, वाजंत्रीं या सर्व गोष्टी सिद्ध असल्या तरी उतावळ्या नवऱ्यानें चतुर्भुज व्हायचें कसें ? बरी वाईट कसली का असेना, मुलगी पाहिजे कीं नको ?

उतावळ्या नवऱ्याला आज नाहीं तरी उद्यां मुलगी मिळतेच मिळते. विठ्ठलरावांच्या टेंकडीवरल्या आयुष्यांतही अशीच सोन्यासारखी संधि प्राप्त झाली. 'परमेश्वराप्रमाणें गोष्टीचा विषयही शोधून काढणें कठीण ' असें म्हणत निराशेनें त्यांनीं सुस्कारा टाकायला आणि कुणाचें तरी रडणें त्यांच्या कानावर पडायला एकच गांठ पडली. त्या गंगयमुना पहायला ते अगदीं उत्कंठित झाले. आज कितीतरी दिवसांत त्यांनीं कुणाचें रडणेंच ऐकलें नव्हतें. दुःखाची आग, अश्रूंचें पाणी,

निश्वासाचा वारा, फाटलेलें आभाळ इत्यादि महाभूतांनींच करुणसृष्टि निर्माण होते. बिचाऱ्या विठ्ठलरावांच्या मदतीला आतांपर्यंत एकही महाभूत आलें नव्हतें. मग त्यांची गोष्ट जुळावी कशी ?

ती रडणारी व्यक्ति मधून मधून मागें पहात, मोठमोठे हुंदके देत, आपल्या विटक्या व फाटक्या लुगड्याच्या पदरानें डोळे पुशीत पुढें आली आणि मट्कन् एका खडकावर बसली. यावेळीं टेंकडीवर दुसरें कोणी असेल अशी त्या बाईची कल्पनाही नसावी. विठ्ठलरावांनीं अगदीं बारकाईनें तिच्याकडे पाहिलें. कपाळाला कुंकू नाहीं ! विधवा ! अरेरे ! टेंकडीवर करुणरसाचा महासागरच उत्पन्न झाला असें विठ्ठलरावांना वाटलें. वैधव्याचा अग्नि बिचारीच्या हृदयाचें पाणी पाणी करीत आहे आणि तें तिच्या डोळयांतून वाहत आहे ! आगीची आंच लागलेलें पान जसें सुकून जातें तसें तिचें लुगडें जीर्ण झालें आहे ! विठ्ठलरावांना कल्पनाच कल्पना सुचूं लागल्या. ते आपल्या कल्पना–जालांत दंग असतांनाच त्या बाईची नजर त्यांच्याकडे गेली. कुणीतरी परका पुरुष आपल्याकडे पहात आहे असें वाटून तिनें तोंड फिरविलें. विठ्ठलराव मनांत म्हणाले, ‘ अरेरे ! किती निर्दय हा समाज ! किती राक्षसी या रूढी ! विधवेला जगाला तोंड दाखविण्याचीदेखील लाज वाटावी ना ? हरहर ! ’ या हरहराबरोबरच त्यांनीं आपल्या मोहिमेला सुरवात केली. आयती बाईची पाठ त्यांच्याकडे झाली होती. पाऊल न वाजवितां ते तिच्याजवळ गेले व मागें उभे राहिले. ती रडतच होती. ‘ विधवेचा किती भयंकर छळ होतो हा ! ’ ते मनांत म्हणाले. त्या बाईला धीर देऊन तिच्याकडून तिची हकीकत काढून घ्यावी अशा विचारानें ते हळूंच म्हणाले, “ बाई, तुमचं दुःख फार मोटं आहे खरं ! पण–”

ती बाई एकदम चमकून उभी राहिली आणि सशाच्या भित्र्या नजरेनें विठ्ठलरावांकडे पाहूं लागली. बाई जागच्या जागीं उभी राहिली हा आपला विजयच होय, असें रावांना वाटलें. ते म्हणाले, “ बाई, तुमचं दुःख मला सांगा. एक नवरा नाहीं म्हणून सबंध जन्म फुकट घालवायचा कीं काय ? ”

सशाचें एकदम सिंहांत रूपांतर झालें! ती बाई चवताळून म्हणाली, "जळळं मेल्या तुझं तोंड!" तिच्या वैधव्याग्नीची ज्वाळा आपल्या तोंडापर्यंत पोंचली, हें पाहून विठ्ठलराव गारच झाले. कदाचित् त्या बाईचा कांहीं गैरसमज झाला असेल असें वाटून ते म्हणाले, "रागावूं नका अशा. माझा हेतु कांहीं–मी–मी–"

"ठाऊक आहेत मेले सारे पुरुष–बाई दिसली कीं–" एवढें बोलून ती सरळ पुढें चालूं लागली.

हातीं आलेलें सावज निसटूं लागलेलें पाहून शिकारी थोडाच गप्प बसतो! विठ्ठलरावही तिच्या मागोमाग जाऊं लागले. हा मनुष्य आपली पाठ सोडीत नाहीं असें पाहून तिनें पळण्याला सुरवात केली. ही दुःखी विधवा आतां टेंकडीवरून खालीं उडी टाकून आत्महत्या करणार असें वाटून विठ्ठलरावही धांवूं लागले. त्या बाईची आतां अगदीं खात्रीच झाली. टेंकडीवर चिटपांखरूंदेखील नाहीं. हा हलकट मनुष्य आपल्याला धरणार! आणि भीतीनें कुठें धांवायचें तेंच तिला कळेना. वाट सोडून ती काजीच्या रानाकडे गेली. तिथल्या झाळकींतून वाट काढणें कठीणच होतें! इतक्यांत तिचा पदर एका फांदीला अडकला तो सोडवून घेण्याकरितां ती थांबते न थाबते तोंच विठ्ठलराव तिथें येऊन दाखल झाले. उंच–सखल टेंकडीवरून धावतां धांवतां त्यांना एक-दोन ठेंचा लागल्या होत्या आणि मध्येंच पाय घसरून पडल्यामुळें त्यांचं अंगही थोडेंसें खरचटलें होतं; पण तें रावाच्या गांवींही नव्हतें. युद्धांतल्या जखमा हीं वीरांचीं भूषणेंच होत, हें वाक्य त्यांच्या अगदीं रोम–रोमांत भिनून गेलेलें असावें. ते अगदीं जवळ आलेले पाहून ती बाई किंचाळली–"शिवूं नका हं मला!"

"विठ्ठलरावांच्या करुणकथेला अधिकच रंग चढला. विधवा बाई आणि त्यांतून अस्पृश्य "अरेरे!" ते मोठ्या कळवळ्यानें म्हणाले, "तुमच्यासारख्या महार-चांभारांची फार दया येते मला! दलितवर्ग–"

नाक फेंदारून आणि डोळे लाल करून ती बाई ओरडली, "तूंच असशील मेल्या महार नी चांभार!"

बाईला दाट झाडींतून पलीकडे पळून जाणें शक्य नाहीं हें ओळखून विठ्ठलरावांनीं तिची सर्व करुण हकीगत काढून घेण्याचा निश्चय केला. ते म्हणाले, “बाई, मला कुणी परका मानूं नका तुम्ही!” झाळकीच्या पलिकडे सळसळ असा आवाज झाला; पण कुणीच दिसलें नाहीं. विठ्ठलराव पुढें बोलूं लागले, “तुमची सारी हकीगत सांगा मला. माझ्याबरोबर हवं तर मुंबईला चला. तिथं —”

“आया-बहिणी कुणी नाहींतच कां तुला?” ती बाई विचित्र स्वरानें म्हणाली.

विठ्ठलराव उत्तर देणार इतक्यांत झाळकींतून रखमाबाई तेथें प्रगट झाल्या! हातांतला तांब्या जमिनीवर आपटून विठ्ठलरावांच्या तोंडापुढें हात ओंवाळीत त्या म्हणाल्या, “घ्या. तिची तरी अक्कल घ्या कांहीं!”

पुढील रेल्वे-रस्ता वाहून गेल्याचें एकदम दिसतांच आग-गाडीच्या ड्रायव्हरची जी स्थिति होते तीच विठ्ठलरावांची झाली. ते थ-थ-थ-प-प-प- करूं लागले. शेवटीं कष्टानें त्यांच्या तोंडांतून एक सुसंबद्ध वाक्य बाहेर पडलें. “अग, पण ऐकून घेशील कीं नाहीं माझं?”

“इतका वेळ ऐकतच होतें कीं आड राहून! काय म्हणे सृष्टि-सौंदर्य पहायला जातों टेंकडीवर! हीच सृष्टि वाटतं तुमची? अन्‌ हें सौंदर्य पहायलाच धांवत होतां वाटतं हिच्यामागनं?”

“अग, तसं नव्हे! ती माझी करुणकथा—”

“ठाऊक आहेत मला सगळ्या कथा नि व्यथा! म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं—भोळा ग बाई भोळा अन्‌ सगळ्या पापांचा गोळा!”

रखमाबाईंचा स्वर हळुहळू उंचावूं लागला. ती बिचारी बाई हा तिरंगी सामना पाहून चकित होऊन गेली होती. विठ्ठलराव बायकोचा गैरसमज दूर करण्याच्या उद्देशानें म्हणाले, “अग, पण—” त्यांचे शब्द पुरे होण्याच्या आधींच खांद्यावर घोंगडें टाकलेला एक

कुरवाडी तिथें आला. त्या बाईकडे रागानें पहात तो म्हणाला, " कुठं सांपडली ही बया तुम्हांला ? "

विठ्ठलरावांनीं त्या मनुष्याकडे पाहिलें. तिचा छळ करणारा हाच तो अधम पुरुष असला पाहिजे असें वाटून ते म्हणाले, " अहो दादा, असे रागावूं नका तिच्यावर. तिचा नवरा मेला हा कांहीं–"

" नवरा मेला ?–नवरा मेला म्हणून सागते काय अवदसा ?–मी चांगला धडधाकट असतांना–"

" म्हणजे ? ही तुमची बायको कीं काय ? "

" हो–हो, ही माझी बायको आहे–आणि तिचं मी मनाला येईल तें करणार. आतां नेतों घरीं आणि दाखवतो इंगा. "

" हें पहा दादा, असं वागणं बरोबर नाहीं. तुम्ही महार-चांभार असलां तरी हरिजन आहांत तुम्ही–"

" मला महार–चांभार म्हणणारा तूं रे कोण ? भंडाऱ्याला महार म्हणतोस ? " तो खलपुरुष तावातावानं म्हणाला.

विठ्ठलरावांना हें कोडें कांहीं केल्या सुटेना. तथापि कांहींतरी बोलायचें म्हणून ते म्हणाले, " पण बायका–माणसाच्या अंगावर हात टाकणं चांगलं का ? "

" हो–हो, फार चांगलं. आफडीची असली म्हणून काम करूं नये कीं काय घरांतलं ? चल ग सटवे घरीं ! "

तो मनुष्य सहकुटुंब निघून गेल्यानंतर रखमाबाईनीं विठ्ठलरावांची चांगलीच हजेरी घेतली. त्यांच्या भडिमारांतून विठ्ठलरावांना दोन गोष्टींचें ज्ञान झालें. एक आफडीची याचा अर्थ विटाळशी व दुसरी–कित्येक जातींत विटाळशीपणीं सधवा देखील कुंकू लावीत नाहींत. पण या ज्ञानाचें कोणत्याही करुणकथेशीं दशांतलें नातें लागणंसुद्धां शक्य नव्हतें !

विठ्ठलरावांची करुण–कथा पट्कर्णी झाली नाहीं ही गोष्ट खरी; पण कांहीं कांहीं गोष्टीच अशा असतात कीं, साऱ्या जगाला त्या कळल्या तरी बायकोला त्यांचा मागमूसदेखील न लागणें बरें असतें. हीहि गोष्ट

अशांपैकींच होती. विठ्ठलरावांचें टेंकडीवरील फिरणें एकाएकीं बंद झालेलें पाहून त्यांच्या मेव्हण्यांनीं विचारलें, "काय, कंटाळा आला वाटतं सृष्टि-सौंदर्याचा ? तसं म्हटलं तर आहे काय पाहण्यासारखं आमच्या या भिकार कोंकणांत ? "

रखमाबाईची मूर्ति समोर दिसत असल्यामुळें वेडसर हास्य करण्यापलीकडे विठ्ठलरावांच्या उत्तराची गति जाऊं शकली नाहीं. ते कांहींच बोलत नाहींत असें पाहून मेव्हणे म्हणाले, "कांहीं होतंय की काय तुम्हांला ? डॉक्टरच्या घरांत राहून आजारी पडलांत तर हंसतील सारे लोक ! "

या किल्लीनें देखील विठ्ठलरावांच्या तोंडाचें कुलूप उघडलें नाहीं. मेव्हण्यांना अधिकच संशय आला—जांवईबोवा भिडस्त असतील कदाचित्. त्यांनीं थर्मामीटर खिशांतून काढला आणि चांगला झाडून विठ्ठलरावांच्या हातांत दिला. मेव्हण्यांचें मन मोडूं नये म्हणूनच कीं काय, विठ्ठलरावांनीं तो खांकेंत लावला; पण अंगांतच ताप नाहीं तर तो उष्णतामापक-यंत्रात येणार कुठून ? माणसाची फजिती मोजणारें एखादें यंत्र डॉक्टराजवळ असतें तर मात्र त्याचा यावेळीं चांगलाच उपयोग झाला असता.

मेव्हण्यांशीं बोलतां बोलतां विठ्ठलरावांना एका रोग्याची हकीगत कळली. चांगला श्रीमंत मनुष्य ! हजारांत उठून दिसेल अशी बायको ! पण बायकोकडे तो ढुंकून देखील पहात नसे. सध्यां तो विषमानें आजारी होता. डॉक्टरनीं त्याची आशा सोडलीच होती. विठ्ठलरावांनीं ही सारी हकीगत मोठ्या उत्सुकतेनें ऐकून विचारलें, "त्यानें बाईबिई ठेवली होती कीं नाहीं एखादी ? "

डॉक्टरना या प्रश्नाचा रोख कळला नाहीं. ते उत्तरले, "तीच तर गमतीची गोष्ट आहे मोठी. ती बाई सदा न् कदा त्याच्या घरीं काय येते, डोळे काय पुसते, नवल आहे मोठं बोवा ! "

विठ्ठलरावांच्या अंतःकरणांत एकदम एक आनंदाची लाट उसळली. करुण—कथेला किती योग्य विषय आहे हा ! वेश्या ! तिचें उत्कट

प्रेम! प्रियकर विषमानें आजारी! मृच्छकटिकापेक्षांही अधिक उदात्त अशी नायिका आपल्याला रंगवितां येईल.

दुपारीं डॉक्टरना त्या गृहस्थाच्या घरचें बोलावणें आलें. बोलवायला आलेल्या मनुष्याच्या चेहऱ्यावरून फारशी आशा दिसत नव्हती. डॉक्टर कपडे करून जायला निघतात तोंच विठ्ठलराव म्हणाले, “ मी येतों तुमच्याबरोबर!”

बाहेर उभ्या असलेल्या मनुष्याला ऐकू न जाईल अशा बेतानें डॉक्टरनीं उत्तर दिलें, “ कशाला येतां असल्या भलत्या वेळीं? त्यापेक्षां रात्रीं देवळांतल्या नाटकाला चला.”

पण विठ्ठलराव कांहीं केल्या आपला हट्ट सोडीनात. डॉक्टरांच्याबरोबर ते रोग्याच्या घरीं गेले. खोलीच्या दाराशींच एक बाई उभी होती. तिच्या नट्ट्यापट्ट्यावरून डॉक्टरांनीं सांगितलेली बाई हीच असावी असें विठ्ठलरावांना वाटलें. डॉक्टर खोलींत जाऊन थोड्याच वेळांत बाहेर आले. त्यांच्या तोंडून निराशेचे उद्गार ऐकतांच त्या बाईनें मोठा गळा काढून रडायला सुरवात केली. ती खोलींत जाण्याकरतां एकसारखी धडपडत होती; पण आंतील माणसें तिला आंत येऊं देत नव्हतीं असें दिसलें. रडतां रडतां ती खालीं बसली. खोलीच्या उंबरठ्यावर तिनें एक–दोन वेळां आपलें डोकेंही आपटलें व शेवटीं तें मोठमोठ्यानें बडवून घ्यायला सुरवात केली.

“एकदां डोळे भरून पाहूं दे तरी हो त्यांना. आज पांच वर्षांत एक दिवससुद्धां मला सोडून कधीं दूर गेले नाहींत–आतां कुठें हो चाललांत मला सोडून?–नका सोडूं मेल्यांनो मला आंत! त्यांच्या नांवचं हें कुंकूं तरी कशाला हवं आतां कपाळावर?” त्या बाईनें खसूकन् आपल्या पातळाचा पदर ओढला आणि त्यानें कपाळाचें कुंकूं पुसून टाकलें.

डॉक्टरांबरोबर घरीं परत येतांना विठ्ठलराव याच प्रसंगाचा विचार करीत होते. बिचारी लग्नाची बायको नाहीं म्हणून तिला शेवटची दृष्ट–भेटसुद्धां घेऊं देऊं नये कीं काय? शूद्रकानें वेश्येला

स्मशानांतल्या घागरीची उपमा दिली आहे. छेः-अगदींच अरसिक तो! पवित्र गंगोदक घातलेला सुवर्णकलश आणि आतां आपण पाहि-लेली वेश्या यांच्यांत काय अंतर आहे? एखाद्या पतिव्रतेप्रमाणें वर्तन आहे तिचें! बिचारीनें कपाळाचें कुंकूंदेखील पुसलें-सतीची चाल असती तर स्वतःला जाळून घ्यायला देखील तिनें कमी केलें नसतें!

करुणकथेला योग्य विषय मिळाला याविषयीं विठ्ठलरावांना मुळींच शंका उरली नाहीं. या बाईचा पूर्वेतिहास कळला तर अशी छान गोष्ट रंगवितां येईल-पण तो कळायचा कसा?-मेव्हण्यांना विचारावें तर आपली जिज्ञासा त्यांना विक्षिप्तपणाची वाटायची! शेवटीं विठ्ठलरावांनीं या संशोधनाला योग्य कूळ शोधून काढलें. घरच्या गड्याशीं गोष्टी करतां करतां त्या बाईची हकीगत त्याच्याकडून त्यांनीं काढून घेतली. देवळा-जवळच तिचें घर आहे हें ऐकून तर त्यांना अत्यानंद झाला. या आनंदाच्या भरांत तो गडी डोळे मिचकावून मिस्किलपणानें आपणांकडे पहात आहे हें त्यांच्या लक्षांतसुद्धां आलें नाहीं.

रात्रीं नाटकाला जाण्याचा विठ्ठलरावांचा बेत डॉक्टरांनीं परोपरीनें मोडून काढला. “बालगंधर्वांची नाटकें पहाणारे तुम्ही! या दशावतारी धांगडधिंग्यांत काय मौज वाटणार तुम्हांला!” या त्यांच्या आक्षे-पाला “दररोज पोळी खाणाऱ्याला एखाद्या दिवशीं नाचण्याची भाकरी खावीशी वाटतेच कीं नाहीं?” असें उत्तर देऊन विठ्ठलराव मोकळे झाले. रखमाबाईंनाही लग्न झाल्यापासून आपल्या मातृ-भूमींतील शंखासुराचें दर्शन झालें नव्हतें. शेवटीं भवति न भवति होऊन विठ्ठलराव, रखमाबाई व गडी एवढी मंडळी देवळाकडे जाण्याला निघाली. देवळाच्या जवळ येतांच एका घराकडे बोट दाखवून गडी हळूच म्हणाला, “हेंच तें घर!”

मागासलेल्या रखमाबाईंना त्याचे शब्द ऐकू गेले नाहींत; पण त्यानें दाखविलेलें बोट व त्यामुळें वळलेली विठ्ठलरावांची दृष्टि हीं मात्र त्यांना दिसलीं. गडी एका भाविणीच्या घराकडे बोट दाखवितो काय

आणि आपला नवरा निलाजरेपणानें बघतो काय! त्यांना असा राग आला कीं—

नाटक सुरू झाल्यानंतर विठ्ठलरावांनीं तिथून हळूच काढता पाय घेतला. तासाभरांत आपण आपल्या करुणकथेचें साहित्य गोळा करून पुन्हां देवळांत हजर होऊं; आपण कुठें गेलों होतों कीं नाहीं याचा बायकोला पत्तासुद्धां लागणार नाहीं, अशी त्यांची कल्पना होती. बाहेर उभ्याउभ्यानें नाटक बघत असलेल्या गड्याला ते म्हणाले, “ येतोंच हं मी लवकर.”

त्यांची पाठ वळलेली पहातांच गड्यानें टीकाकाराच्या रुबाबानें मान डोलविली. ‘काय हे पांढरपेशे लोक अन् काय ही त्यांची चालचलणूक!’ असाच त्याच्या त्या मान डोलविण्याचा अर्थ होता.

विठ्ठलराव इकडे-तिकडे पहातच त्या भाविणीच्या अंगणाच्या पायऱ्या चढले. अशा अपरात्रीं आपल्याइतक्या उदात्त हेतूनें या पायऱ्यावर कोणाही पुरुषानें कधीं पाऊल टाकलें नसेल, असा अहंकाराचा विचार त्यांच्या मनांत या वेळीं चमकून गेला! वेश्या! वेश्या म्हटलें कीं किळसवाणा शृंगार डोळ्यांपुढें उभा राहतो; पण आतां आपणांला उदात्त करुणरसाचेंच दर्शन होणार! नाटकाला सारीं माणसें गेलीं असल्यामुळें आजबाजूंच्या घरांत सर्वत्र सामसूम दिसत होतें. विठ्ठलरावांना वाटलें अरेरे! सारीं माणसें तिकडे देवळांत आनंदांत निमग्न झालीं आहेत आणि इकडे ही दुर्दैवी स्त्री दुःखांत बुडून गेली आहे! केवढें हें उज्वल प्रेम!

घराचें दार बंद असल्यामुळें विठ्ठलराव सोप्याच्या पायऱ्या चढून हळूच कानोसा घेऊं लागले. हुंदका, विलाप, ‘देवा, असा कसा रे निष्ठुर झालास तूं!’ अशा अर्थाचे उद्गार कांहीं ना कांहीं आपल्याला खास ऐकूं येणार अशा आशेनें त्यांनीं कान टवकारले; पण त्यांची निराशाच झाली! थोड्या वेळानें कुजबुज ऐकल्याचा त्यांना भास झाला. ही बाई घरांत कुणाशीं बोलत असावी? ती एकटी राहते असें गड्यानें आपल्याला सांगितलें होतें. कुणी पुरुषबिरुष—छेः छेः!

किती घाणेरडी शंका घेतली आपल्या मनानें ! आज दुपारीं, मानलेल्या पतीसाठीं जिनें आपल्या कपाळाचें कुंकू पुसून टाकलें, ती एकाद्या परपुरुषाबरोबर या वेळीं गुलगुल गोष्टी करीत बसेल हें अगदीं अशक्य ! पण कुजबुज तर ऐकूं येते. खास, तिला वेडच लागलें असावें ! स्वतः-शींच बडबडत असेल ती वेडाच्या भरांत ! अरेरे !

विठ्ठलरावांच्या कारुण्यसमुद्राला प्रलयकालची भरती आली; आणि त्यांचें भान क्षणभर नाहींसें झालें. आंतले शब्द स्पष्ट ऐकूं येऊं लागल्यामुळेंच कीं काय ते लवकर शुद्धीवर आले. नाहींतर—

"सारंच मुसळ केरांत. त्या डायरींत टिपून ठेवलं असेल ना त्यानं सारं–"

"पण मी तरी काय करूं ? कालपासून खोलींत जायला धडपडत होतें मी; पण तो मेला मेव्हणा आला होता ना त्याचा ?"

"मरो तो मेहुणा ! तुझ्या माझ्या गळयाला फांस लागायची पाळी आली कीं. त्या दिवशीं तुझ्या घरीं तो आला–इथंच त्याला ताप भरला. त्या नोटा इथंच गेल्या असंच जो तो म्हणणार. त्यांतून डायरींत जर का त्यानं नंबर टिपलेले असले तर ? परवां दिवशीं डायरी देतों म्हणून त्यानं तुला सांगितलं होतं ना ?"

"हो. म्हणूनच मी धडपडलें कालपासून. आज दुपारीं तर असं नाटक केलं कीं–देवळांतलं आत्तांचं नाटक फिक्कं पडेल त्याच्यापुढं."

विठ्ठलराव या संवादाचा अर्थ लावण्यांत इतके तल्लीन झाले कीं, दार उघडून आंतलीं माणसें बाहेर आलीं तेव्हां कुठें त्यांना आपल्या विचित्र परिस्थितीची कल्पना आली. ते चट्कन् अंग चोरून बाजूच्या कोंपऱ्यांत उभे राहिले. पळून जाण्याचा प्रयत्न करावा तर चोरीचा आरोप अंगावर यायचा ! 'जें जें होईल तें तें पहावें' या संतवचना-खेरीज त्यांना या वेळीं दुसऱ्या कशाचाच आश्रय मिळणें शक्य नव्हतें. ती बाई आणि तिच्याशीं बोलणारा तो पुरुष, दोघांचीही पाठ त्यांच्या-कडे होती. त्या बाईच्या हातांतील दिव्याच्या प्रकाशांत विठ्ठलरावांना तिच्या पातळाची चमकणारी किनार दिसली. करुणकथेच्या स्वप्नांतून

ते हळूहळू जागे होऊं लागले. ती बाई त्या पुरुषाला लाडक्या स्वरानें म्हणाली " मला भय वाटतंय गडे. इथंच रहाना आज. आतां कांहीं तुम्हांला भ्यायला नको कुणाला ! "

" जिवंतपणीं भ्यालों नाहीं त्याला ! मग मेल्यावर कसली आलीय भीति ? मला भीति वाटते आहे एका गोष्टीची. त्याची ती डायरी जर–"

" हळु बोला ना, कुणी ऐकलं तर? भिंतीलासुद्धां कान असतात." असें हलक्या आवाजानें उद्गार काढून त्या बाईनें पाठ फिरवून सगळीकडे पाहिलें तों–

तों काय ?– याच वेळीं धरणीकंप कां झाला नाहीं, असें विठ्ठलरावांना होऊन गेलें. ते शक्य तितकें अंग चोरून उभे राहिले होते; पण अंग ही कांहीं अशी वस्तु नाहीं कीं ती सारीच्या सारी चोरतां येईल. विठ्ठलरावांना पाहतांच ती बाई थरथरा कांपूं लागली. तो पुरुष गुरगुरतच पुढें आला आणि हातांतली छडी वर करून त्यानें दरडावून विचारलें,

" कोण रे तूं ? "

वाग्देवता प्रसन्न करण्याकरितां विठ्ठलरावांनीं आजचें हें दिव्य केलें होतें; पण ऐन संकटाच्या वेळीं ती त्यांना अजिबाद सोडून गेली. त्यांच्या तोंडांतून शब्दच उमटेना. त्या मनुष्यानें त्यांना कोंपऱ्यांतून खसकन् पुढें ओढलें आणि तो निरखून त्यांच्या चेहऱ्याकडे पाहूं लागला. ' म-म-म-मी-मी-मी ' एवढीच विठ्ठलरावांना वाचा फुटली.

" तुला कुणीं पाठविलं तें ठाऊक आहे मला– " तो मनुष्य विठ्ठलरावांच्या अंगावर खेंकसून म्हणाला.

" नाहीं. कुणीं पाठविलं नाहीं. मी-मीच आलों. ह्या–ह्या–ह्यांच्याकडे आलों होतों–" विठ्ठलराव होती नव्हती तेवढी शक्ति एकवटून बोलले. त्यांच्या या शब्दांचें त्या बाईकडून स्वागत होण्यापूर्वीच खळ्यांतून रखमाबाईची मेघगर्जना ऐकूं आली––

" दिवे ओंवाळा तोंडावरून !– म्हणे ह्यांच्याकडे आलों होतों ! कोंकणांत यायची अवदसा एवढ्याकरितांच आठवली वाटतं ? "

विठ्ठलराव मट्कन् खालींच बसले. आपली पत्नी देवळांतलें नाटक सोडून इकडे अचुक कशी उत्पन्न झाली, हें त्यांच्या मुळींच लक्षांत येईना.

नाटकाला गेलेली मंडळी लवकर परत आलेली पाहून डॉक्टरनीं विचारलें, “ कां ताई, कसं काय झालं नाटक ? ”

“ जन्माचंच नाटक झालंय् मेलं ! ” रखमाबाईनीं रडक्या आवाजांत उत्तर दिलें.

दुसऱ्या दिवसापासून विठ्ठलरावांनीं सोन्याच्या फुलांच्या गोष्टी करण्याला सुरवात केली.

( १९३२ )

———

# तृणांकुर

## ( १ )

## परमेश्वर

बाहेर अंधार पडला होता. टोळाला तिथं करमेना. तो खिडकींतून खोलींत आला. दिव्याचे किरण अंगावर पडतांच त्याचा हिरवा रंग चमकूं लागला. जणुं कांहीं मावळतीकडे कलंलेल्या सूर्याच्या प्रकाशानें चमकणारें समुद्राचें पाणीच !

टोळ अभिमानानें आपल्या रंगाकडे पाहत होता !

'घुर घुर' असा आवाज कानीं पडतांच त्यानें दचकून पाहिलें. दिव्याच्या खालीं एक मांजर बसलें होतें. किती काळेंकुट्ट होतें तें ! दिव्याखालीं अंधार म्हणतात तें खोटें नाहीं कांहीं !

अभिमानाच्या लाटा टोळाच्या मनांत जोरानें उचंबळूं लागल्या, "माझा रंग कसा हिरवा हिरवा गार आहे. अगदीं पाचूसारखा ! नाहींतर हा दिव्याखालचा कोळसा !"

तो आनंदानें नाचूं लागला.

पांखरें झाडावर कशीं खेळकरपणानें नाचतात. आतां या डहाळीच्या टोकाला झोंका दे, लगेच त्या डहाळीशीं फुगडी खेळ ! टोळही तसेंच करूं लागला. क्षणांत छपरापर्यंत भरारी मारावी, क्षणांत भिर्रकन् खालीं यावें.

येतां येतां त्याला वाटलें "कसं आहे माझं शरीर ! जणुं कांहीं विमानच. नाहींतर तो दिव्याखालीं बसलेला काळभैरव ! खटारा आहे झालं नुसता !"

दिव्याखालीं मांजर खिन्न मुद्रेनें बसलें होतें. आज चार दिवसांत उंदीर लांब राहिला, पण पाल—फार काय झुरळसुद्धां त्याला मिळालें

नव्हतें. 'घुर्र घुर्र' करीत तें मोठ्यानें म्हणालें, "किती निर्दय आहे देव ! आज चार दिवस झाले--"

त्याचे हे शब्द ऐकून टोळाला आश्चर्य वाटलें. देव आणि निर्दय? ज्या देवानें आपल्याला हा सुंदर हिरवा रंग दिला, विमानासारखें चपळ शरीर दिलें, तो देव निर्दय कसा असेल ? दिव्याशेजारीं उडी मारून तो म्हणाला "बोकोबा, महामूर्ख आहेस तूं. देव दयाळू आहे. बघ, देवानं दिलेला हा माझा रंग बघ. हें बघ विमान वर चाललं."

पण तें विमान उडण्यापूर्वीच जमिनीवर कोसळून पडलें. मांजरानें अचुक टिपण साधलें होतें.

टोळानें आक्रोश केला, "देव निर्दय आहे. दु-ष्ट—"

मांजर मिटक्या मारीत म्हणालें, "देव दयाळु आहे, फार दयाळू, आहे." (१९३३)

(२)

## सुधारक !

शेंपूट तुटलेला कोल्हा म्हणाला, "बंधुभगिनीनों, आधीं केलें, मग सांगितलें अशा मताचा आहें मी! शेंपटामुळेंच मनुष्यापेक्षां कोल्ह्याचा दर्जा कमी ठरला आहे. मनुष्य म्हणजे काय ? शेंपूट नसलेला वानर !— सृष्टीनें दिलेली प्रत्येक गोष्ट प्राण्याच्या उपयोगीं पडेलच असेंही नाहीं. मनुष्यांतील नर पहा. त्याच्या तोंडावर दाढीमिशांचें जंगल रात्रंदिवस वाढत असतें. पण तो तें छाटून आपली सुधारणा करीत आहे. म्हणून आपण सर्वांनीं एक लांगूल-उच्चाटन दिन पाळावा आणि त्या दिवशीं शेंपूट कापण्याची सुधारणा अंमलांत आणावी अशी माझी नम्र विनंती आहे."

सर्व कोल्हे आपल्या म्हाताऱ्या पुढाऱ्याकडे टकमक पाहूं लागले. लांडया कोल्ह्याचें म्हणणें त्यांना खरें वाटूं लागलें होते.

म्हातारा कोल्हा उठला व रेंकत म्हणाला, "आजच्या विद्वान वक्त्यांनीं सांगितलेल्या गोष्टीला माझी लांगूलपूर्वक संमति आहे."

लांडा कोल्हा मधेंच ओरडला "ऐका, ऐका!" म्हातारा पुढें बोलूं लागला, "शेंपूट कापल्यावर तें पुन्हां हवेंसें झालें तर तें उगवण्याची सोयही झाली आहे आतां. एका शास्त्रज्ञानें तसा शोधही लावला आहे—"

लांड्या कोल्हानें घाईघाईनें विचारलें "नांव काय त्याचं?"

म्हाताऱ्यानें प्रश्न नकळल्यावर घालविला.

तो शेंपूट तुटलेला कोल्हा एकदम उठून ओरडला "अहो आजोबा, तो शोध लावणाराचा पत्ता हवाय् मला" एकदम प्रचंड कोल्हेकुई उठली. ती ऐकतांच लांड्या कोल्ह्याच्या लक्षांत आपली चूक आली. त्यांत समाधान एवढेंच कीं सभेंतून पळतांना शेंपटाचें ओझें त्याला वागवावें लागलें नाहीं.

( ३ )

## हृदय

आपल्या अंगच्या निर्मळपणाचा त्याला मोठा अभिमान वाटे. गवताच्या चिमण्या पातीनें कुठें डोकें वर केलें तर तेंसुद्धां तो तत्काळ छाटून टाकी. पलीकडील झाडाचीं पानें मधून मधून अंगणांत पडत. पण लगेच तीं वेंचून तो बाहेर फेंकून देई.

पण पुढें पुढें त्याला तें अंगण ओकें वाटूं लागलें. तें निर्मळ असलें तरी त्याला आनंद होईना.

एके दिवशीं त्याला एक लहर आली. एक मोगरीची वेल त्यानें अंगणाच्या कोंपऱ्यांत लावली. आपल्या निर्मळ मनाचें समाधान करतांना तो म्हणाला "जाऊं दे तेवढा कोंपरा! श्रीमंत मनुष्यानें थोडें तरी दान करायला नको कां?"

मोगरीला कळे आले. तो दुरूनच त्यांच्याकडे पाही. कळे फुलले. आतां मात्र त्याला दूर राहवेना. जवळ जाऊन त्यानें तीं मुग्धमधुर फुलें हळूंच हातांत घेतलीं. नकळत अंगणाकडे त्याची पाठ झाली. सुवासानें धुंद झालेल्या त्याच्या मनाला अंगणांत गळून पडलेल्या पानांचा आवाज ऐकूंही आला नाहीं.

## (४)
## क्षितिज

पृथ्वी आणि आकाश दोन्ही सुंदर! पण एकमेकांपासून किती दूर!

कवीच्या कल्पनेला हें दूरत्व बोंचू लागलें. कुठेंतरी आकाश आणि पृथ्वी यांचें मीलन झालें असेल असें त्याला वाटलें. पण पृथ्वीप्रदक्षिणा करूनही हें मधुर दृश्य त्याला पहायला मिळालें नाहीं.

त्याच्या कल्पनेनें क्षितिज निर्माण केलें. पृथ्वी आणि आकाश याच्या मधुर मीलनाचें स्थान म्हणून त्या रेषेकडे तो बोट दाखवूं लागला. अनेकांनीं कवीच्या प्रतिभेचें कौतुक केलें. पण एका अडाणी माळ्याला ही कल्पना पटेना. पृथ्वी आणि आकाश हीं जिथें एकमेकांना भेटतात त्या क्षितिजाकडे स्वत:बरोबर येण्याचा तो कवीला आग्रह करूं लागला. कवि म्हणाला "दुरूनच पाहिलें पाहिजे तें."

माळ्यानें पृथ्वी आणि आकाश यांची भेट प्रत्यक्ष दाखविण्याचें कबूल करतांच कवींचे नवरस आटून गेले. त्याच्या म्हणण्याचा अर्थच कळेना त्याला.

माळ्यानें त्याला आपल्या बागेंतील एका सुंदर आम्रवृक्षाखालीं नेलें. झाडावरील एका पिकलेल्या मोहक आंब्याकडे त्यानें बोट दाखविलें. कवि क्षणभर गोंधळला. दुसऱ्याच क्षणीं त्याला वाटलें, आपल्या-पेक्षां माळ्याचें म्हणणेंच खरें आहे. पृथ्वी आणि आकाश यांच्या मील-नाचें मधुर फळच आहे हें!

## (५)
## शहाणें मेंढरू

टेंकडीवर मधेंच खड्डा होता तो! आंवतीभोंवतींच्या हिरव्यागार पानांकडे पाहात धांवणाऱ्या मेंढरांना तो कसा दिसावा?

सर्वांत पुढचें मेंढरू एकदम तोल जाऊन आंत पडलें. त्याच्या मागच्याला वाटलें—या खड्ड्यांतच कांहींतरी विशेष असलें पाहिजे. त्यानें मागेंपुढें न पाहतां आंत उडी टाकली.

एक–दोन–तीन–चार–पांच हळूहळू खड्डा भरून येऊं लागला. शेवटचें मेंढरू आंधळेपणानें पुढें गेलें. पण खड्डा पूर्णपणें भरून आला असल्यामुळें इतर मेंढरांच्या अंगावरून धडपडत कसेंबसें तें पलीकडल्या बाजूला लागलें. लगेच तें मागें वळून म्हणालें "मूर्ख कुठली! वाटेंतला खड्डासुद्धां दिसत नाहीं कां?"

( ६ )

## युगांतर

आद्ययुगांतील ऋषींना स्फूर्ति झाली. परमेश्वराचें स्वरूप पाहण्याचा त्यांच्या प्रतिभेनें प्रयत्न केला. वेद जन्माला आले. मात्र परमेश्वराविषयीं 'नेति नेति' एवढेंच ज्ञान त्यांना झालें! जनता विस्मयानें म्हणाली 'खरें तत्वज्ञान तें हें!'

मध्ययुगांतील सज्जनांना स्फूर्ति झाली. परमेश्वराचें स्वरूप पाहण्याची प्रतिज्ञाच केली त्यांनीं. मग काय? दगड देव बनला; वानर ईश्वर झाला. परमेश्वर जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं आहे असें ज्ञान त्यांना झालें. जनता आनंदानें उद्गारली "खरी भक्ति ती ही!"

विज्ञानयुगांतील शास्त्रज्ञांना स्फूर्ति झाली. दगडापासून वानरापर्यंत सर्वांच्या जीवनावर आपल्या शोधांचा प्रकाश त्यांनीं पाडला. पण परमेश्वर कुठेंच दिसेना. ते तुच्छतेनें म्हणाले 'नेति नेति'. जनता क्रोधानें किंचाळली "नास्तिक, नास्तिक!"

( ७ )

## रम्य बालपण

फिरायला निघालेली ती तीन मंडळी क्षणभर मुग्ध झाली. आंबराईत कोकिळा गात होती 'कुहू कुहू'! पांच वर्षांचा मुलगा नाचत नाचत गाऊं लागला 'कुहू कुहू'.

तिशींतल्या तरुणानें हातांतील वेताच्या छडीनें जमिनीवर ताल धरीत गुणगुणायला सुरवात केली–

'अवेळ तरिही बोल, कोकिळे–'

साठी उलटलेले आजोबा आपला दांडा खणकन् वाजवून म्हणाले ' चला लवकर, फिरून यायला उशीर होईल फार. '

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं हीच मंडळी आंबराईजवळून जात होती. वानरांचा एक कळपचा कळप ' ख्याक् ख्याक् ' असा कर्णकटु स्वर काढीत झाडांवरून इकडे तिकडे नाचत होता.

आजोबा न थांबतांच पुढें गेले. तरुणानें त्या दांत विचकणाऱ्या वानरांकडे तिरस्कारानें पाहिलें आणि छडी फिरवीत तो पुढें चालूं लागला. क्षणभरानें तो वळून पाहतो तों बाळ मागेंच राहिलेला ! तो ओरडला ' अरे चल लवकर-'

त्याला उत्तर मिळालें ' हुप्प ! हुप्प '.

(१९३६)

---

# संगम

दादासाहेबांनीं कागद वाचून सपतांच ते टेबलावर टाकले. वाऱ्याच्या झोताबरोबर त्यांतले एक दोन उडून खालीं पडले. पण ते उचलून ठेवायला दादासाहेब कांहीं उठले नाहींत. त्यांच्या मनांत आलें—आज सख्या भावांची ताटातूट करणारे हे कागद तरी एकत्र कसे नांदतील? या कल्पनेनें त्यांना हंसूं आलें पण त्या हंसण्यानें त्यांच्या मुद्रेवरील अंधुक उदासीनपणा कांहीं उजळला नाहीं. खुर्चीवरून उठतां उठतां दोन्ही हात उंच करून त्यांनीं आपलीं बोटें एकमेकांत अडकविलीं आणि चांगला आळस दिला. टेबलावरल्या कागदपत्रांतलें भावनाशून्य जग विसरण्याकरितांच कीं काय, ते खिडकीपाशीं जाऊन बाहेर पाहूं लागले.

शेजारच्या बंगल्याच्या आवारांत मोटारची दुरुस्ती चालली होती. नेहमींप्रमाणें सकाळीं आंघोळ करून कामाला बसतांना खटखट अशा आवाजानें या गोष्टीकडे दादासाहेबांचें लक्ष गेलें होतें. त्यांनीं आतां निरखून पाहिलें. अजून मोटारीची दुरुस्ती चाललीच होती. इकडे तिकडे अस्ताव्यस्त पसरलेले तिचे भाग——भाऊबंदकीचें मूर्तिमंत चित्रच होतें तें. त्यांनीं समोर पाहिलें. मोकळ्या जागेंत चिरपी लांकडें चिरत होते. जवळपास होणाऱ्या एखाद्या बंगल्याची पूर्वतयारी असावी ती! करवतीचा खर्र खर्र असा तो आवाज त्यांना अत्यंत कर्कश वाटला.

पलीकडे आपल्या अभ्यासाच्या खोलींत कमल गात होती. लहानपणीं आजीपाशीं शिकली होती ती तें गाणें.

**सुरेख संगम किती। सखे ग।**
**कृष्णा मिळाली कोयनेप्रती॥**

दादासाहेबांनीं नकळत मान वळवून टेबलावरील कागदपत्रांकडे पाहिलें. त्यांच्या चेहऱ्यावरून मंद स्मित चमकून गेलें. जणुं कांहीं

ते म्हणाले ‘ काव्य आणि व्यवहार यांत जमीन-अस्मानाचें अंतर असतें. ’

त्यांनीं खिडकींतून आकाशाकडे पाहिलें. त्याच्या भव्य दर्शनानें मनुष्याचा क्षुद्रपणा विसरतां येतो हा अनुभव त्यांनीं अनेकदां घेतला होता. पण आज काय झालें होतें कोणाला ठाऊक! त्या स्वच्छ निळ्या आकाशाकडे पाहून त्यांच्या मनाचें असमाधान अधिकच वाढलें. वधूवरांवर अक्षता टाकून लग्नमंडपांतील माणसें पांगतात ना? तसें झालें होतें यंदा अगदीं. मृगाच्या पावसाचे चार शिंतोडे टाकून मेघमंडळींनीं जो पळ काढला होता तो आषाढ संपत आला तरी त्यांचा पत्ता नव्हता. त्यामुळें आकाशाकडे पाहतां पाहतां दादा-साहेबांना वाटलें— आकाश आणि पृथ्वी या भावंडांतही भांडण आहेच कीं! आकाशानें जवळ असलेलें विपुल पाणी कुठेंतरी लपवून ठेविलें आहे आणि इकडे पृथ्वी तहानेनें व्याकुळ झाली आहे. समो-रचीं झाडें धुळीनें कशीं माखून गेलीं होतीं. भोंवतालच्या बंगल्यांचीं छपरें-पाऊस न पडल्यामुळें किती जुनीं-पुराणीं दिसत होतीं तीं!

‘ दादा— ’

कमलच्या हांकेनें दादा आपल्या विचारांतून जागे झाले. उजवा हात एका दारावर ठेवून ती उभी होती. पंधरा सोळा वर्षांची मुलगी. त्यांतून उफाड्याची. दादांना क्षणभर वाटलें कीं आपली मृतपत्नी मुग्ध रूप घेऊन आली आहे. कमलचे ओंठ, जिवणी, सारें कांहीं हुबेहुब आईच्यासारखें होतें.

मुलीकडे वात्सल्यानें पाहत दादा म्हणाले “ काय कमलाकर ? ” कमलाकर ही त्यांची प्रेमाची हांक असे नेहमीं.

“ साडेदहा होऊन गेले कीं ! ”

“ आज शाळेंतला पहिला तास गाणं बिणं आहे कीं काय ? ” जवळ जाऊन तिची पाठ थोपटीत त्यांनीं प्रश्न केला.

“ हें काय हो दादा ? गाण्याशिवाय मला—” दादांनीं हांक मारली ‘ जयंत—’. कमलच्या पलीकडच्या खोलींतून सतरा अठरा वर्षांचा

मुलगा बाहेर आला. दादांनीं त्याच्या डोळ्यांकडे निरखून पाहिलें. थेट आईचे डोळे! अशा वेळीं ते नेहमीं मनांत म्हणत–' माझी पत्नी मला सोडून गेली नाहीं. या दोन मुलांच्या रूपानें माझ्यापाशींच आहे ती."
" चल ना जेवायला ".

" आज पहिला तास नाहीं मला दादा. "

" आणि असला तरी तो चुकवितां येतो कीं! " दादा हंसले. त्यांच्याबरोबर कमलही हंसली. तिचें हंसणें पाहतांच जयंतच्या कपाळावर एक बारीक आठी पडली. त्याचें त्यालाच कळत नव्हतें, पण अलीकडे कमलविषयीं त्याच्या मनांत एक अढी उत्पन्न झाली होती. दादा तिचे लाड अधिक करतात असें त्याला वाटे. पातळें, झंपर, आंकडे, तेलें किती खर्च करीत असे ती. पातळांइतकें वैचित्र्य पायजम्याच्या कापडांत असत नाहीं हा काय दादांचा दोष होता? पुरुषांनीं केंस ठेवून भांग काढला तरी आंकड्यांचा कान टोंकरण्याखेरीज त्यांना कांहीं उपयोग नाहीं याला बिचारी कमल तरी काय करणार? पण जयंतच्या हें लक्षांतच येत नसे. तो आपल्या कॉलेजांतल्या मित्रमंडळींत गुरफटलेला तर कमल आपल्या शाळेंतल्या मैत्रिणींत दंग. पूर्वी दोघांचें एक जग होतें. पण त्या एकाचीं आतां दोन जगें झालीं होती. एवढेंच नव्हे, तर तीं एकमेकां पासून दूरवर जात होतीं. नुकत्याच घरांत आलेल्या रेडियोनें जयंताच्या मनांतली अढी अधिकच दृढ झाली. त्यानें दादांना रेडियो घ्यायला सांगितला तेव्हां दादा म्हणाले होते " कॉलेज बुडवून रेडियोपाशींच बसशील तूं. " पण कमलनें हट्ट धरतांच मात्र दादांनीं मुळींच आढेवेढे घेतले नाहींत.

त्यामुळें जेवायला न जातां जयंत परत आपल्या खोलीकडे वळण्याच्या विचारांत होता. पण दादा हंसून म्हणाले " रात्रीं जेवायला जायचंय मला. तेव्हां तुझ्या पंक्तीचा लाभ आतांच दे कीं मला. " अगदीं निरुपाय झाला जयंताचा. मात्र जेवतांना त्यानें मौनव्रत धारण केलें होतें. कमलनें दादांना विचारलें, "रात्रीं परत केव्हां येणार तुम्ही?"

" दहा तरी वाजतील."

कमलचा चेहरा खिन्न झाला. दादा थट्टेनें म्हणाले " एकदम आभाळसं आलं ? "

" आज छान गाणं आहे आपल्या रेडियोवर. "

" किती वाजतां ? "

" साडेआठ ते दहा."

" मग तूं नी जयंत ऐका माझ्याबद्दल. बाकी गाणं चुकतं म्हणून फार कांहीं वाईट वाटायचं नाहीं मला. "

कमळच्या हातांतील कढीचा भुरका तसाच राहिला. तिनें प्रश्नार्थक दृष्टीनें दादांच्याकडे पाहिलें.

" चार दिवस तूं नी जयंत गुणगुणत राहणारच कीं ! आमच्या-सारख्यांना काय, सेकंडहँड गाणंसुद्धां चालतं. "

कमल खुदकन् हंसली आतांपर्यंत गंभीर असलेल्या जयंतानेंही स्मित केलें.

" माझ्या मैत्रिणींना बोलाविणार आहे मी गाणं ऐकायला. नी कॉफी करणार आहे त्यांच्यासाठीं. "

" कॉफीच्या वेळेपर्यंत नक्की येतों मी. मग तर झालं ? "

\+ + +

वकिलांच्या बैठकीच्या खोलींत चहाच्या वेळीं जो तो दादा-साहेबांचें कौतुक करीत होता. त्या भाऊबंदकीच्या दाव्यांत त्यांची बाजू दुबळ होती असें सर्वांना वाटत होतें. पण कुशल सेनापतीनें दुबळ्या सैन्याला जय मिळवून दिल्याचीं उदाहरणें काय थोडीं आहेत ? आज दादासाहेबांनींही तसाच विजय मिळविला होता.

पण अशा आनंदाच्या वेळींही दादासाहेबांचें लक्ष वकील मंड-ळींच्या स्तुतीकडे मुळींच नव्हतें. या दाव्यांत त्यांनीं भावाभावांचीं काळींकुट्ट अंतःकरणें अगदीं जवळून पाहिलीं होतीं. त्यामुळें उबगून गेलेल्या त्यांच्या मनाला कशांतच गोडी वाटत नव्हती. प्रेत पाहिल्या-

नंतर एकप्रकारचें क्षणिक वैराग्य नाहीं का येत? तसें झालें होतें त्यांना. ते शून्य दृष्टीनें आकाशाकडे पाहत होते. तेंही काळेंकुट्ट होऊन गेलें होतें अगदीं.

संध्याकाळीं क्लबांत जातांच दादासाहेबांनीं कमलच्या मैत्रिणींकरितां मोटार पाठवून दिली. पण एरवींप्रमाणें आज त्यांचें मन खेळांत रमेना. राहून राहून त्या जिंकलेल्या खटल्यांतले भाऊ त्यांच्यापुढें उभे राहत. दोघांत वीस वर्षांचें अंतर. थोरल्यानें धाकट्याचा प्रथम प्रेमानें प्रतिपाळ केलेला. पण धाकटा त्याच्यावर उलटला आणि एका जुन्या कागदाच्या आधारानें कुटुंबाकरितां झालेला कर्जाचा सारा भार थोरल्याच्या शिरावर बसला. थोरल्यानेंही धाकट्याला बुडविण्याकरितां नंतर अनेक कारवाया केल्या होत्या.

त्यांच्या मनाप्रमाणें हवाही कुंदच होती आज. आकाशांत सुरू झालेला गडगडाट तावा तावानें भांडणाऱ्या माणसांची आठवण करून देत होता. साडेदहा वाजतां जेऊन ते बंगल्याकडे यायला निघाले तेव्हां पावसाची बुर बुर सुरू होऊन रस्त्यावर थोडासा चिखल झाला होता. मोटारीच्या भिंगावर तो मधूनच एकदोनदां उडाला त्यावेळीं दादासाहेबांच्या मनांत आलें—चिखलाचे शितोडे उडालेल्या या कांचेसारखेंच झालें आहे आपलें मन. स्वच्छ पाण्यानें शितोडे पुसतां येतात. कठोर व्यवहारानें आलेला उदासीनपणा घालवायला प्रेमळ हृदयांचा सहवासच हवा. बस्स! घरीं गेलें कीं कमल आणि जयंत यांच्याशीं खूप गप्पा मारायच्या, त्यांना गायला लावायचं. जगांतल्या व्यवहारानें आपल्याला येणारा शीण पूर्वी पत्नी नाहींशी करी. ही संजीवनी या मुलांत जणु कांहीं ठेवून गेली आहे ती!

‘ कमलाकर, जयंत ’ म्हणून त्यांनीं मोठ्यानें हांका मारल्या खऱ्या! पण दार उघडलें तें स्वयंपाकीणबाईनीं! त्यांना वाटलें, कमल वर अजून मैत्रिणींतच गुंग असेल. पण खालीं हंसणें, खिदळणें बिलकुल ऐकूं येत नव्हतें. सारा शुकशुकाट. ते जिना चढून थेट रेडियोच्या खोलींत गेले. तिथें कुणीच नव्हतें. कमलच्या खोलीपाशीं जाऊन त्यांनीं हांक

मारली. दार आंतून लावलें होतें. त्यांनीं हांक मारतांच एक हुंदका मात्र ऐकूं आला. गोंधळून ते जयंताच्या खोलीकडे गेले. त्याचेंही दार आंतून बंद होतें. दादांनीं हांक मारतांच 'फार डोक दुखतंय माझं' एवढेंच सांगितलें त्यानें. खाट करकर वाजली यावरून तो अस्वस्थ-पणानें कुशीवर वळला असावा एवढें दादासाहेबांनीं ताडलें.

सबंध दिवस उबगून गेलेल्या त्यांच्या मनाला या प्रकारानें अधिकच त्रास झाला. जड पावलांनीं ते आपल्या खोलीकडे वळले. त्यांनीं दार उघडलें. पण त्यांचें पाऊल मात्र पुढें पडलें नाहीं. कडकड करीत वीज एकदम कुठें तरी पडली. तिचा प्रकाश साऱ्या खिडक्यांतून लखकन् असा चमकला कीं दादासाहेब क्षणभर जागच्या जागींच स्तंभित झाले. त्यांच्या मनांत मात्र विचार आला—आज नुसत्या विजाच पडणारसें दिसतें.

कपडे काढून ठेवतांना त्यांची नजर टेबलाकडे गेली. दोन पत्रें! आणि तींही पोस्टांतून आलेलीं नव्हेत. त्यांनीं तीं आश्चर्यानें फोडली. पहिलें कमलचें होतें. 'जयंतसारख्या भावाबरोबर घरांत राहण्या-पेक्षां बोर्डिंगांत राहणें हजारपटीनें बरें. उद्यां मला हिंगण्याला पाठवा.' एवढाच मजकूर होता त्याच्यांत. जयंतानें लिहिलें होतें 'कमलसारख्या बहिणीबरोबर घरांत दिवस काढणें कठीण आहे. उद्यांपासून रेसिडेन्सींत रहायला जाण्याची इच्छा आहे माझी.'

या पत्रांवरून बहीणभावांचें मोठें भांडण झालें आहे हें उघड दिसत होतें. पण त्याचें कारण? दादांचें मन म्हणत होतें—'मुलांना त्रास होऊं नये म्हणून आपण दुसऱ्या लग्नाचा विचारही वावडा मानला. व्यवहाराच्या तापलेल्या मनुष्याला घरांत प्रेमाची सावली हवी. हे चिमणे रोपे पुढें मोठे होतील आणि त्यांच्या गर्द छायेंत—पण आजन्म भांडणाची आग पेटविणारीं हीं भावंडें—कसला गारवा मिळणार पुढें यांच्याकडून?

अस्वस्थ मनानें ते खालीं गेले. स्वयंपाकीणबाईनीं भांडणाची मोडकी तोडकी हकीगत सांगितली. त्यावरून त्यांना थोडीफार कल्पना

आली. रेडियोवरचें गाणें ऐकण्याकरितां कमलनें आपल्या मैत्रिणी बोलावल्या होत्या. जयंताचे मित्रही आले होते कांहीं. कमल व तिच्या मैत्रिणी साडेआठला वर जाऊन बघतात तों रेडियोजवळच्या सर्व खुर्च्या जयंताच्या मित्रांनीं अडवलेल्या. हवा चांगली नसल्यामुळें गाणेंही नीट ऐकूं येत नव्हतें. कमलनें डोळयांत पाणी आणून विनवणी केली. पण जयंतानें तिच्याकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. शब्दावरून शब्द वाढत गेले. खूप उखाळयापाखाळया निघाल्या. परक्या मुलीं-समोर बहीण टाकून बोलते म्हणून जयंत चिडला. अनोळखी मुलां-समोर भावानें आपला अपमान केला म्हणून कमल रागावली. गाणें रेडिओवर आणि कॉफी चुलीवरच राहिली. सारी मित्रमंडळी चोरट्या मनानें निघून गेली. बहीणभावानीं आपआपल्या खोल्यांची खाडखाड दारें लावलीं आणि तीं आंतून बंद केलीं.

दादासाहेब वर येऊन आपल्या खोलींतल्या खिडकींतून बाहेरील भयाण अंधार पाहत होते. मधून मधून वीज चमके. जणुं कांहीं ती त्या भयंकर अंधारावर प्रकाश पाडण्याचा निष्फळ प्रयत्नच करीत होती. दादासाहेबांच्या पुढें प्रश्न उभा राहिला—मानवी मन नेहमीं असें अंधारा-नेंच भरलेलें रहायचें काय ? प्रेमळपणाचा प्रकाश क्षणिक, पण कलहाचा अंधार मात्र चिरंतन !

अशा अस्वस्थ मनःस्थितींत शांत झोंप तरी कुठून येणार ? सुमारें एक वाजला असेल, आपल्या दारापाशीं कांहींतरी वाजलें असें त्यांना वाटलें. ते उठून बसले. कदाचित् रडून दमलेली कमल आपल्याकडे आली असेल असें त्यांच्या मनांत आलें. त्यांनीं खिडकींतून बाहेर पाहिलें. अंधार तसाच होता. पण आतां वीज चमकत नसून पावसाची मुसळ-धार सर कोसळत होती.

दार उघडून ते बाहेर आले. पण तिथें कुणीच नव्हतें. कमलच्या खोलीकडे जाऊन पाहतात तों तिचें दार सताड उघडें. जयंताच्या खोली-चीही तीच स्थिति ! दोन्ही मुलें गेलीं तरी कुठें ? बाल्य आणि तारुण्य यांच्या सीमेवरलें भय मोठें चमत्कारिक असतें. जितकें मोहक तितकेंच

मारक! मामी टाकून बोलल्यामुळें पंधराव्या वर्षी आपण आगगाडी खालीं जीव द्यायला गेलों होतों हें दादांना आठवलें. भयभीत मनानें जिना उतरून मुलांना शोधण्याकरितां ते खालीं आले. पाहतात तों देवघरांतला दिवा लागलेला! पाऊल न वाजवितां ते देवघराच्या दारा-आड उभे राहून पाहूं लागले.

जयंत कमलच्या पाटीवरून हात फिरवून तिचें समाधान करीत होता. "ताई, माझीच चूक झाली."

"नाहीं दादा, माझीच!"

स्वतः अपराधी ठरण्याकरितां जणुं कांहीं त्यांची अहमहमिका चालली होती.

जयंताच्या डोळ्यांतले अश्रु पुशीत कमल म्हणाली "हें काय दादा?"

"नी तुझं काय चाललंय?" घोगऱ्या स्वरांत त्यानें प्रश्न केला. थोडा वेळ दोघांनींही आपल्या अश्रूंना बाहेर वाट करून दिली. मग जयंत हंसत म्हणाला "तूं कां आलीस इथं?"

"तुझ्या खोलींतला दिवा एकदम दिसेनासा झाला. दारही वाजलें. मला वाटलें माझ्यावर रागावून आम्हांला सोडून चाललास तूं! धांवतच आलें बघ मी. अगदीं राहवेना मला. देवघराच्या दारात येतें तों तूं आईच्या फोटोपुढें गुडघे टेकून बसलेला दिसलास, मग—"

"आई स्वप्नांत आली बघ माझ्या. ती आजारी होती तेव्हां तुला न् मला जवळ घेऊन बसली होती ना? तश्शी दिसत होती अगदीं. 'जयंत आतां तुझी आई कमल आणि कमलची आई तूं' असें त्यावेळीं म्हणाली होती ती. तें सारें आठवलें मला. मी मघाशीं तुझ्यावर चिडलों, तशी आई कधीं रागावली असती कां?"

"नी मी तुला नाहीं नाहीं तें बोललें. आई अशी कधींच बोलली नसती तुला."

बहीण भावंडांनीं एकमेकांचे हात घट्ट धरले. जणुं कांहीं डोळ्यांनींही प्रगट करतां येणार नाहीं असा उमाळा तीं स्पर्शानें व्यक्त करीत होतीं. देवघरांतला दिवा मालवून दोघेंही बाहेर पडलीं.

स्वयंपाक घरावरून जातांना कमल म्हणाली ‘ दादा, कॉफी घेऊन जाऊं या कीं. ’ लगेच तिनें तिथला दिवा लावलाही.

कमल कॉफीचा दुसरा पेला भरीत असतांना तिच्या कानावर एकदम शब्द पडले. “ बोर्डिंगांत अपरात्रीं नाहीं अशी कॉफी मिळायची ! ” तिनें चमकून पाहिलें. दारांत दादा उभे होते. ती तशीच स्तब्ध राहिली.

जवळ जाऊन दादा म्हणाले “ कमलाकर, आणखी एक पेला भरायला हवाय्. ”

दोन्हीं मुलें कॉफी पितांना गालांतल्या गालांत हंसत होतीं. मोठ्या तापांतून उठल्यावर शरीर अशक्त होतें. पण दृष्टीला सारी सृष्टि पाहतांना लहान मुलासारखा आनंद होत असतो अगदीं. त्या बहीण–भावंडांच्या मनाची स्थिति अशीच झाली होती. दादांच्या पुढें जिन्यावरून धांवतच तीं वर गेलीं. दादा खोलींत जाऊन पाहतात तों त्यांच्या टेबलावरील चिठ्ठयांचे तुकडे केराच्या टोपलींत पडत होते.

पाऊस खळल्यासारखा वाटल्यामुळें त्यांनीं खिडकी उघडून बाहेर पाहिलें. आभाळ बरेंच निवळलें होतें. अंधुक चांदण्यांत चमकणारें जमिनीवरील पाणी तर विलक्षण मोहक दिसत होतें. ते कमलला म्हणाले “ कमल, एक गाणं म्हणायला हवं आतां. गाणं झाल्यावर कॉफी आहेच पुन्हां. ”

कमलनें हंसत विचारलें “ काय म्हणूं ? ”

“ सुरेख संगम किती– ”

( १९३६ )

———

# शिकार



'कसली शिकार चालली आहे एवढी?' त्यांनीं चपापून खिडकींतून मागें वळून पाहिलें. मला खोलींत येऊन किती वेळ झाला याची कल्पनाच नव्हती त्यांना. मी मात्र आजच्या या निराळया दृश्यानें गोधळून गेलें होतें.

रात्रीं खोलींत पाऊल टाकलें कीं स्वारी आरामखुर्चीवर बसलेली दिसायची, हातांत बहुधा एखादी इंग्रजी कादंबरी असायची, आणि सुंदर हरिणाच्या कातड्यानें सुशोभित केलेल्या माझ्या आवडत्या खुर्चीत मी बसलें कीं वाचलेल्या भागांतील गंमती सांगायला सुरवात व्हायची. एकदां कुठल्याशा कादंबरींतील नायिकेच्या सौंदर्याचें मोठें रसभरित वर्णन करणें झालें. त्यावेळीं मी थट्टेनें म्हणालें 'अशा वेळीं पश्चात्ताप होत असेल नाहीं?'

'कसला?'

'माझ्याशीं लग्न केल्याचा'

त्यांनींही मौजेनें उत्तर दिलें 'लग्न ही शिकार आहे एक. सिंहाची तयारी करावी तेव्हां कुठें ससा मिळतो!'

मनुष्य शब्दांचा अगदीं बंदा गुलाम आहे हेच खरें! लग्नाला शिकार गंमतीनें म्हटलें त्यांनीं! पण त्यामुळें माझ्या मनांत नाहीं नाहीं त्या अभद्र कल्पना आल्या. माझ्या चेहऱ्यावरही त्यांचें अस्पष्ट प्रतिबिंब पडलें असावें. माझ्या खांद्यावर स्निग्धपणानें हात ठेवून ते म्हणाले, 'पण सुधा, ही शिकार इतर शिकारीपेक्षां अगदीं निराळी असते हं! एक सावज मिळालें कीं दुसरें मिळविण्याचा शिकाऱ्याला मोह पडतो— अगदीं कैफ चढतो. पण एकदां लग्न झालं—"

पुढें न बोलतां त्यांनीं विलायतेंत असतांनाच्या आपल्या डायऱ्या कपाटांतून काढल्या. डायऱ्या कसल्या? चांगली नोटबुकेंच होतीं

तीं. त्यांच्या वडिलांनीं त्यांना लहानपणापासून डायरी लिहिण्याची संवय लावली होती. एक डायरी उघडून तिचें पान त्यांनीं माझ्यापुढें केलें. तें वाचतांच उलगडा झाला सारा. मोहाचे प्रसंग कुणाच्या आयुष्यांत येत नाहींत? पण त्यांनीं माझ्यावरील प्रेमामुळें टाळले होते ते! त्या पानावर त्यांनीं लिहिलें होतें–' मनुष्याचें मन कसें पतंगासारखें आहे. हजारों मैलावरून सुधेचें प्रेमसूत्र मला संभाळीत आहे म्हणून बरें. नाहींतर इथल्या विलक्षण वाऱ्यांत ही वावडी कुठें वाहवत गेली असती कुणाला ठाऊक!'

वाङ्मयाचा प्रोफेसर होऊं इच्छिणाऱ्या पण वडिलांचा कारखाना पुढें चालविण्याकरितां धंद्यांत शिरलेल्या मनुष्यांत काव्य कसें लपून बसलेलें असतें याचा प्रत्यय त्या लिहिण्यावरून मला आला. खडकांतलें पाणी फार खोल असतें; पण तें तितकेंच गोड असत नाहीं कां?

कपाटांतल्या डायऱ्या मला दाखवून ते म्हणाले "हव्या तेव्हां पाहत जा माझ्या डायऱ्या. डायरीचे इतर उपयोग काय असतील ते असोत! पण बायकोच्या मत्सरावर रामबाण औषध आहे तें!"

आतां त्या दिवसाची आठवण होऊन मला वाटलें– स्वारी कांहीं तरी गंमतीचें उत्तर देणार. पण मागें वळून क्षणभर त्यांनीं माझ्याकडे पाहिलें आणि खिडकींतून पुन्हा ते बाहेर पाहूं लागले.

मी जवळ जाऊन म्हटलें 'काय पाहणं चाललंय एवढं?'

'अंधार!'

'अंधारांत शिकार कशी करायची ह्याचा विचार चाललाय वाटतं?' कांहीं तरी बोलायचें म्हणून मी बोलून गेलें खरी! पण लगेच दशरथ राजाची गोष्ट आठवली मला. अंधारांत हत्तीवर म्हणून त्यानें बाण सोडला. पण आंधळ्या आईबापांचा एकुलता एक आधार नाहींसा करण्याचें पाप लागलें त्याला. च्–च्—काय भलतेंच बोलून गेलें मी!

तिकडलें मन कशानें तरी विलक्षण खिन्न झालें आहे हें माझ्या लक्षांत आलें. मी टेबलाकडे वळलें. आजची डायरी अर्धवट लिहून तशीच ठेविली होती तिथें.

" मजुरींत साडेबारा टक्के कपात केल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. बाबांनीं कारखाना काढला तेव्हां धंद्यांतली स्पर्धा आणि सरकारी धोरण यांच्या कात्रींत त्याचे तुकडे तुकडे होतील अशी कल्पनाही शिवली नसेल त्यांना. पण आजचा अनुभव ? स्वतःचा खर्च कमी करण्याकरितां सुधेची स्वतंत्र मोटार होती ती काढून टाकली, माझे शिकारीचे लांब-लांबचे कार्यक्रम रद्द केले. मजुरांची गरिबी कुणाला कळत नाहीं ? पण करायचें काय ? आज संध्याकाळीं कपातीच्या नोटिशीवर सही केली. मात्र सही करितांना पाणीदार डोळ्यांनीं आपल्याकडे रोंखून पाहाणाऱ्या एखाद्या हरिणावर गोळी घालावी तसें वाटलें मला. या गोष्टीचें दुःख करण्यांत काय अर्थ आहे ह्मणा ? एका दृष्टीनें सारें जग शिकारीच आहे कीं ! आणि वर्षापूर्वी त्या मोहक हरिणीला मी मारलें नसतें तर सुधेचें इतकें आवडतें झालेलें तें सुंदर कातडें मला कधीं तरी मिळालें असतें कां ? "

इथेंच मजकूर संपला होता. तो वाचून होतांच मी माझ्या आवडत्या खुर्चीकडे पाहिलें. नकळत माझ्या पापण्यांच्या कडा ओलसर झाल्या. त्या खुर्चीवरील तें सुंदर कातडें—जणुं कांहीं ती हरिणी सजीव होऊन माझा उपहास करीत आहे असा भास मला झाला.

\+ \+ \+

दुसऱ्या दिवशीं ते कारवारकडल्या कुठल्याशा जंगलांत शिकारी-करितां निघून गेले. कपातीमुळें कारखान्यांत होणाऱ्या हांकाटीची मला चांगलीच कल्पना होती. अशा वेळीं त्यानीं जागेवर नसणेंच बरें हें मलाही पटलें. शिवाय जातांना ते म्हणाले होतें तेंही कांहीं खोटें नव्हतें. ' मन कठोर करायला शिकारीसारखं साधन नाहीं दुसरं. '

ते गेल्यानंतर रात्रीं अंथरुणावर पडल्या पडल्या त्यांचें हें वाक्य वारंवार आठवे. वाटे, कठोरपणाखेरीज जगतांच येऊं नये असें कां हें जग आहे ? त्यांचा तरी काय दोष होता ? वडिलांनीं देशी धंदा म्हणून कारखाना काढला. तो चालावा म्हणून आपली आवड बाजूला सारून तिकडून एक प्रकारचा त्यागच केला. कारखान्याला मंदी जाणवूं लागतांच

स्वतःच्या घरचा खर्चसुद्धां कमी करणें झालें. एवढ्यानेंही भागेना. मग मजुरांचा पगार कापायचा नाहीं तर करावयाचें तरी काय ?

अशा वेळीं अर्धवट गुंगीत कांहीं तरी विचित्र स्वप्नें दिसत आणि मी घाबरून जागी होई. एकदां तर कारखान्यांतून हरिणांचे कळपच्या कळप बाहेर धांवत येतांना दिसले मला ! आणि त्यांच्या मागें बंदूक घेऊन लागलेली तिकडची स्वारी—अगदीं घामाघूम होऊनच जागी झालें मी. स्वतःच्या मनासारखं वैरी नाहीं कुणी ! वाटायला लागलें—शिकारीला गेले आहेत तिकडे कांहीं अपघात झाला तर ? शेंकडो मजुरांचा तळतळाट आपणांला बाधल्याशिवाय राहील कां ? मी शिकलीसवरलेली होतें, नवसांवर माझा विश्वास नव्हता, आमच्या घरांत देवही नव्हते. पण जिला शरण जातां येईल अशी शक्ति जगांत असती तर फार बरें झालें असतें असें त्यावेळीं माझ्या मनांत आल्यावांचून राहिलें नाहीं. 'सारें जग शिकारीच आहे' हें त्यांचें वाक्यही असेंच राहून राहून मनांत येई. जगांत शेराला सव्वा शेर असत नाहीं कां ? तसा शिकाऱ्याची शिकार करणारा कुणी तरी असणारच ! ही कल्पना मनांत येतांच अंगावर कांटा उभा राही. पांखरासारखे पंख असते तर भुर्रकन् ते असतील तिथें गेलें असतें आणि त्यांच्या हातांतील बंदूक फेंकून देऊन त्यांना घरीं घेऊन आलें असतें. पण दररोज जिवाला संभाळून राहण्याविषयीं पत्र पाठविण्यापलीकडे मी कांहींच करूं शकलें नाहीं.

+ + +

आठ दिवस माझा जीव सारखा धुकधुक करीत होता. त्यामुळें दारांत स्वारीची हंसरी मुद्रा पाहतांच विलक्षण आनंद झाला मला. नेहमींची पद्धत म्हणजे आल्याबरोबर शिकारीच्या साग्रसंगीत वर्णनाला सुरवात व्हायची. पण आजचा नूर कांहीं निराळाच होता. चहा घ्यायच्या आंतच स्वारी टेबलापाशीं बसली. मी जाऊन पहातें तों कांहीं तरी लिहिणें चाललेलें.

'शिकारीचं वर्णन येणार आहे वाटतं एखाद्या मासिकांत ?'

'हो.'

'कुठल्या ?'

‘ कारखान्याच्या. ’

खुर्चीवरून उठत त्यांनीं नुक्तीच लिहिलेली नोटीस माझ्या हातांत दिली. मजुरांच्या पगारांतली कपात रद्द केली होती त्यांनीं.

चमत्काराच्या समुद्रांत मी बुडून गेलें अगदीं. कपातीची नोटीस काढण्यापूर्वी त्यांनीं किती चालढकल आणि किती विचार केला होता हें काय मला ठाऊक नव्हतें? मग शिकारीहून परत येतांच ती नोटीस रद्द करण्याचें कारण काय? मध्यंतरीं कारखान्यांतले मजूर त्यांना भेटणार तरी कुठून आणि त्या जंगलांत मध्यस्थी करायला जाणार तरी कोण?

चहा घेतांना मी हळूंच म्हटलें, ‘ चमत्काराचं युग आहे हल्लींचं ! ’

‘ हो. कालच वाचलं कुठं तरी. साधूची सुसर झाली म्हणे ! ’ मोठ्या आनंदानें हंसत त्यांनीं उत्तर दिलें.

‘ इश्श ! ’

‘ नाहीं पटत? बरं, जग पांच वर्षं मागं गेलं आहे हें तरी आहे कां कबूल? ’

‘ कशावरून? ’

‘ तूंच सांगते आहेस ! ’

‘ मी? ’

‘ हो. तूं आज कशी दिसते आहेस सांगूं? लग्न झाल्यावर आपण या बंगल्यांत ज्या दिवशीं आलों— ’

मी त्यांच्याकडे पाहिलें. आनंदानें मनुष्य तरुण होतो हेंच खरें. त्यांच्या चेहऱ्यावरील काळजीच्या रेषा नाहींशा झाल्यामुळें तेसुद्धां नेहमींपेक्षां लहान दिसत होते. कसला तरी आनंद त्यांच्या रोमरोमांत नाचत होता. या आनंदी डोळ्यांनींच ते माझ्याकडे पाहत होते यांत शंका नाहीं.

चहा होतांच ते लगबगीनें कारखान्याकडे गेले. माझी जिज्ञासा अगदीं उतूं जाऊं लागली. मी प्रवासाच्या सामानांतून त्यांची डायरी शोधून काढली आणि मधल्या आठ दिवसांची हकीगत वाचूं लागलें.

पहिल्या चार दिवसांचें वर्णन नेहमींप्रमाणेंच होतें. पण पांचव्या दिवसाची हकीगत वाचतांना मात्र माझ्या अंगावर शहारे आले.

" आज निराळ्या पद्धतीची शिकार करायचें आम्ही दोघांनीं ठरविलें. संध्याकाळीं जंगलांत जाऊन तेथील खोल खड्ड्यांत बसायचें आणि रात्रीं काय काय सावजें मिळतात तीं पहायचीं. झाडावरून अगर सुरक्षित जागेवरून कुणीही शिकार करील. पण जंगली जनावराशीं समोरासमोर सामना देण्यांतच खरें धाडस आहे.

" मनुष्यप्राणी स्वभावतः साहसी आहे हें खरें; पण त्याच्या साहसी वृत्तीला सृष्टि मर्यादा घालते. तसें पाहिलें तर आम्ही दोघे होतों. पण त्या खड्ड्यांत जाऊन बसल्यावर बाहेर पसरलेला अफाट अंधार जणु कांहीं आमच्या हृदयावरही अंमल गाजवूं लागला. कशाला या फंदांत पडलों असें झालें. दहा साडेदहा वाजल्यावर जनावरांचे चित्रविचित्र संमिश्र आवाज ऐकूं येऊं लागले. मधूनच उठून बॅटरीच्या प्रकाशांत दूरवर कांहीं दिसतें कां पहावें, पुन्हां बॅटरी बंद करावी असें चाललें होतें. आमचे घरांत बसून आकाशांतील नक्षत्रांकडे पाहतांना मोटी मौज वाटते. पण त्या खड्ड्यांतून दिसणाऱ्या दोनच चांदण्या ! त्यांच्याकडे पाहतांना काळपुरुष आपल्याकडे डोळे मिचकावून पाहत आहे असा विचार माझ्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं. आमच्या हातांत बंदुका होत्या खऱ्या; पण गर्द अरण्य, गाढ अंधार आणि भयंकर जनावर या निसर्गाच्या शस्त्रापुढें त्या लुल्याच पडल्या असत्या. मुकाट्यानें आम्ही खड्ड्याबाहेर आलों आणि बॅटरीच्या प्रकाशांत सावधपणानें चालूं लागलों. पदोपदीं कुठून तरी हिंस्र श्वापद येईल असें वाटे. मृत्यूच्या त्या राज्यांतून दीड दोन मैल आम्हांला जायचें होतें. पांच हजार रुपयांच्या आशेनेंसुद्धां अशा अपरात्रीं गरीब मनुष्य जेथें जाणार नाहीं तिथें केवळ धाडस म्हणून आम्ही शिरलों होतों. मूर्खपणा पुष्कळदां वेषांतर करून धाडसाचें रूप घेतो हें कांहीं खोटें नाहीं.

आह्मीं निम्में अंतर चालून गेलों असूं नसूं. एकदम पानांचा सळसळ असा मोठा आवाज झाला. घाबरून जवळच्या एका मोठ्या

झाडाकडे आम्ही दोघेही धांवलों. झाडाच्या बुंध्याशीं उभे राहून बॅट-रीचा प्रकाश पाडला. तशा स्थितींतही आमच्या धैर्याचें आम्हांला हसूं आल्यावांचून राहिलें नाहीं. डोक्यावर लांकडाचा एक मोठा भारा असलेली बाई होती ती. प्रकाश दिसतांच तीही घाईनें पुढें आली. एक विटकें अर्धेच लुगडें कसें बसें ती नेसली होती. आम्ही विचारायच्या आंतच तिनें आपली हकीगत सांगितली. दररोज जंगलांतून मोळ्या नेऊन विकणें हा तिचा पोटाचा धंदा. नवरा मरून गेलेला. पदरांत चार कच्चींबच्चीं. तान्हें मूल आजारी असल्या-मुळें दररोजची मिळकत तर मुळींच पुरत नव्हती. म्हणून संध्याकाळीं अधिक लांकडें गोळा करण्याच्या नादाला ती लागली. अंधार पडला. त्यांतच एका जनावराची चाहूल लागली. घाबरून वाट चुकून फिरफिर फिरली. घरीं मुलें भिऊन गेलीं असतील म्हणून जीव मुठींत घेऊन चालली होती. आतां लांकडाची मोळी जंगलांत टाकून जाणें शक्यच नव्हतें तिला. मोळी नाहीं तर उद्यां पेजेला तांदूळ नाहींत.

"तिची हकीगत ऐकत असतांना माझ्या हृदयाचें पाणी झालें. हातांत बंदुका असलेले आम्ही शिकारीसुद्धां जिथें सुखासुखी जाणार नाहीं तिथें दररोज जिवावर उदार होऊन ती येत होती. गरिबी—पोट—पोटचे गोळे—

"कारखान्यांतील मजुरांची कपात एकदम माझ्या डोळ्यांपुढें उभी राहिली. माझ्या मजुरांत आणि त्या बाईंत काय अंतर होतें ?

"जगांत प्रत्येकजण शिकारी आहे असें मी थट्टेनें नेहमीं म्हणत असे. आज त्या बोलण्याचा खरेपणा विलक्षण रीतीनें पटला मला ! आमच्याऐवजी त्या बाईनेंच शिकार केली यांत संशय नाहीं. माझ्या मनांतला स्वार्थी, हिंस्र भाग तिच्या साध्या शब्दांनीं एका क्षणांत निर्जीव होऊन गेला. (१९३६)

———

# जुना कोट

देशावरल्या मनुष्याला कोंकणांत गेल्याबरोबर अगदीं नव्या सृष्टींत प्रवेश केल्याचा भास होतो. कुणी म्हणेल, दिवाळसणाकरितां सासुरवाडीला जाणाऱ्या जांवयाला तसें वाटायचेंच. त्यांतून गरिबींतून वर आलेल्या गृहस्थाच्या लाडक्या लेकीचा दिवाळसण. मग जांवईबापू कुरकुर कशाला करतील ?

अशा वेळीं मनांत मधुर हुरहुर असते हे कांहीं खोटें नाहीं. चांगल्या रंगत चाललेल्या नाटकांत अंकाचा पडदा पडला म्हणजे उतावळ्या प्रेक्षकाचा विरस होत नाहीं कां ? लग्नाच्या पहिल्या वर्षी बायको माहेरीं जाते तेव्हां प्रत्येक पतिराजाची अशीच स्थिति होत असली पाहिजे. पण विरहाचा पडदा दिवाळसणानें दूर होणार होता यामुळें कोंकणची सृष्टि मला नाविन्यानें नटलेली दिसली असें मात्र म्हणतां येणार नाहीं. हिरव्यागार गोष्टींचा तारुण्याशीं कांहीं तरी गूढ निकट संबंध निःसंशय आहे. त्यामुळें सासुरवाडीच्या सोप्यावरून दिसणारे समोरचे हिरवे माड, भोंवतालच्या हिरव्यागार केळी, अंगणांतील किंचित् काळसर हिरव्या अशा उंच उंच तुळशी यांच्याकडे सहज नजर गेली तरी मनांत येई—देशावरला प्रदेश निर्माण केल्यानंतर फार उशीरां देवानें कोंकण घडविलें असावें. जुन्या घरांतून नव्या बंगल्यांत रहायला जावें, अगर जुना कोट बोहऱ्याला देण्याकरितां आईच्या अंगावर टाकून नवा अंगांत घालावा अशा वेळीं मन त्या नाविन्यानें क्षणभर हुरळून जातेंच कीं नाहीं ? कोंकणांतल्या सृष्टीनें मी असाच मुग्ध होऊन गेलों. नरकचतुर्दशीच्या दिवशीं पहांटे सोप्यावर लावलेल्या पणत्यांनीं अंगणांतला अंधार उजळून टाकला तेव्हांची शोभा कांहीं विलक्षणच होती. भोंवतालच्या भंडाऱ्यांच्या घरांतून 'गोविंदा, गोविंदा' म्हणून जो कल्लोळ ऐकूं येत होता तोही मला मोठा मौजेचा वाटला.

नरकचतुर्दशीला तिकडे चावदिवस म्हणतात. दूधपोहे, दहीपोहे, गूळपोहे, सर्व तऱ्हांचे पोहे चावण्याचें काम शेजारींपाजारीं जाऊन या दिवशीं करावें लागतें. घरचे सर्व मंगल संस्कार झाल्यावर सासऱ्याच्या-बरोबर बाहेर जाणें प्राप्तच होतें मला. मी नखशिखांत नव्या कपड्यांनीं नटून माझ्या खोलीबाहेर आलों. पाहतों तों ते एक फार जुनापुराणा दिसणारा कोट अंगांत घालून उभे ! मी स्वस्थ राहिलों. म्हटलें, त्यांना कोटबिट बदलायचा असेल अजून. पण त्यांनीं 'झालं ना?' म्हणून विचारतांच 'हो' हें उत्तर माझ्या तोंडांतून निघूनही गेलें.

त्या दिवशीं निरनिराळ्या घरीं मी खाल्लेल्या पोह्यांत चागले वाईट कोणते होते हें घरीं आल्यावर बायकोनें फिरफिरून विचारलें तरी मला सांगतां येईना. एके ठिकाणीं तर खडा चावल्यानंतर माझें लक्ष गेलें होतें तिकडे. मी एकच विचार करीत होतों—आज सणावारीं माझ्या सासऱ्यानीं महायुद्धापूर्वीचा हा कोट कां घातला आहे ? चिक्कूपणा ? छेः ! त्यांचा दुसरा चांगला कोट मी पाहिला होता. शिवाय लग्नांत आणि आतां दिवाळसणांत हाताची मूठ घट्ट धरण्याचा त्यांचा स्वभाव नाहीं हा प्रत्यक्ष अनुभव आला होता मला. माझ्या बायकोच्या लहानपणीं ते एका व्यापाऱ्याच्या पेढीवर साधे कारकून होते खरे. पण त्यांचा थोरला मुलगा वकील झाल्यावर लक्ष्मीची कृपादृष्टि त्यांच्या घरावर एकदम वळली होती. मग हा कोट ? विक्षिप्तपणा म्हणावें तर एकही उदाहरण आठवेना तसलें. इथून तिथून गोडवा आणि समंजसपणा भरला होता त्यांच्या स्वभावांत.

सारी दुपार मी त्यांच्या त्या जुन्या कोटाचा विचार करीत होतों. माझ्या मनांत आलें—ऐतिहासिक कादंबऱ्यांतलीं भुयारें आणि सामाजिक गोष्टींतलीं प्रणयरहस्यें सर्वस्वीं खोटीं नसावींत. कोंकणांतील एका खेड्यांत उभें आयुष्य काढणाऱ्या कारकुनाच्या चरित्रांतही जुन्या कोटाचें गौप्य असतेंच कीं ! मात्र या कल्पनेचें माझें मलाच हंसू आलें. बायकोला विचारावें तर एखादे वेळीं रागही यायचा तिला ! नवऱ्यानें आपल्या नव्या जरीच्या लुगड्याऐवजीं आपल्या बापाच्या जुन्या कोटा-

कडे लक्ष दिल्याबद्दल अरसिकांतही गणना करायची ती माझी! म्हटलें, असेल कांहीं तरी कुळाचार! कोंकणांत असल्या गोष्टींचें फार बंड असतें असें अनेकदां ऐकलें होतें मी.

संध्याकाळ झाली होती तरी आम्ही समुद्रावर फिरायला गेलों. मऊ वाळूतून चालतांना होणाऱ्या गुदगुल्या, ओहोटीमुळें आंत गेलेल्या समुद्राची किंचित् उदास दिसणारी शोभा, पश्चिमेकडे साजरी होणारी मनोहर रंगपंचमी—विविध रंगांनीं रंगलेले ते ढग पाहून मला सुंदर कपड्यांनीं भरलेल्या वस्त्रभांडाराची आठवण झाली. आणि लगेच, कां कोण जाणे, माझी नजर माझ्या सासऱ्यांच्या जुन्या कोटाकडे वळली. त्यांच्याही तें लक्षांत आलें असावें.

" मुलींच संकोच करूं नका हं इथं " ते प्रेमानें म्हणाले.

मी नुसता हंसलों. क्षणभर थांबून एकदम धीर केला आणि म्हटलें " एक गोष्ट विचारूं कां तुम्हांला ? "

" दिवाळसणाला हवं तें मागण्याचा हक्कच आहे कीं जांवयाचा. "

मी त्यांच्या कोटाकडे निरखून पाहत आहे हें त्यांनीं ओळखलें. ते अगदीं मोकळेपणानें हंसले.

" ह्या कोटाची कथा म्हणतां ? अगदीं साधी आहे ती ! "

" पण "— ह्या एका शब्दाच्या उच्चारानें माझी उत्सुकता त्याना पूर्णपणें कळली. ओहोटीमुळें रिकाम्या पडलेल्या वाळवंटाच्या भागाकडे त्यांनीं क्षणभर टक लावून पाहिलें. नंतर माझ्याकडे वळून ते बोलूं लागले. " पंचवीस वर्षांपूर्वीचा कोट आहे हा. पांच वर्षें एकसारखा वापरून टाकून द्यायला निघालों होतों तो मी ! निघालों होतों काय ? देऊन टाकलाच होता म्हणाना. पण—मनी झाली त्या वर्षींची ही गोष्ट. पायगुणाची पोरगी आहे मोठी ! "

मला मनांतल्या मनांत हंसूं आवरेना. माझी पत्नी मोठ्या पाय-गुणाची कशावरून ? तर टाकून द्यायच्या लायकीचा कोट तिचे वडील भर दिवाळींत घालूं लागले म्हणून. वाः ! तिचा असला पायगुण माझ्या आयुष्यांत न दिसेल तर बरें.

पुन्हां समोरील भयाण मुकतीकडे पाहत ते म्हणाले " मनीच्या जन्मापूर्वीच्या आमच्या गरिबीची कल्पना येणार नाहीं तुम्हांला. तुम्हांला कशाला ? आतां स्वप्नांत ते दिवस आठवले तरी मन कसें गुदमरून जातें माझें. हा समुद्र आटला तर समोरचा देखावा पहायला क्षणभर तरी बसाल कां तुम्ही इथं ? " अनुभवाची तीव्रता मनुष्याला कवि करूं शकते हें त्या एका वाक्यावरून दिसत होतें.

" आमचा संसारही तसाच होता वीस वर्षांपूर्वी. दुकानावरली तीस रुपयांची नोकरी. नाहीं म्हटलें तरी पांचसहा माणसें मध्यान्हकाळीं पानावर बसायचीं. थोरला मुलगा खूप हुषार. इंग्रजी सातवींत गेला होता तो. एकीकडे त्याचा खर्च, दुसरीकडे घरांत दिवस गेलेले. डोहाळेही मोठे खडतर होते मनीच्या वेळचे. मदतीला माणूस ठेवायचें कशाच्या बळा-वर ? एके दिवशीं तिची द्राक्षांवर इच्छा गेली. बेळगांवहून तीं आणणें माझ्या दृष्टीनें कठिणच होतें. पण बायकोला एवढेंही सुख देतां येऊं नये याचें फार वैषम्य वाटलें मला. पुढें तीं द्राक्षें खातांना दरवेळीं ती आदरून म्हणे " यापेक्षां नवा कोट स्वतःला केला असता तर ! "

त्यांच्याकडे मला पाहवेना. जगांत दारिद्र्य किती भयंकर थैमान घालतें याचा अनुभव माझ्यासारख्या सुखवस्तु मनुष्याला कुठून येणार ? ज्वालामुखीच्या पोटांतील कढ हिमालयाला कधींच कळावयाचे नाहींत

आवंढा गिळून ते पुढें सांगूं लागले "त्या वेळीं दिवाळी जवळ आली होती अगदीं. दुकानाचा जमाखर्च बहुतेक पुरा झाला होता. मालकांनीं तिजोरींतली शिल्लक मोजली. सारें कांहीं बरोबर जमलें. मध्यंतरीं पांचशे रुप-यांची एक रक्कम अनामत येऊन पडली होती. पण तिची आठवणच नव्हती त्यांना. एका बाईची भानगड होती ती. तसला हिशेब जमाखर्चाला कधींच लागत नसतो. त्या नोटा परत करायच्या म्हणून वरच्या कपाटांतील कप्यांतील जुन्या कागदपत्रांच्या रुमालांत मालकांनीं ठेवल्या होत्या. त्या ठेवल्या त्याच्या दुसऱ्याच दिवशीं ते विषमानें आजारी पडले. तीन चार महिने तरी ते दुकानावर आले नाहींत. दुसरे दोन भाऊ सर्व व्यवहार

पाहत. त्यांचीं व्यसनेंही कांहीं कमी नव्हतीं. एकदोनदां तिजोरींतील पैसेही उचलले होते त्यांनीं. त्यामुळें पुढें मागें या पैशांची मालकांना आठवण झाली तरी प्रकरण माझ्या अंगावर शेकण्याचा संभव नव्हता. जवळ जवळ पंधरा वर्षे मी दुकानावर होतों. कधीं नारळाच्या बोंडयाला हात लावला नव्हता त्यांच्या ! त्यामुळें माझा संशय येण्याचा संभवच नव्हता. ते पांचशे रुपये परस्पर उचलण्याचा मोह अगदीं अनिवार झाला मला. ”

मी त्यांच्याकडे पाहिलें. त्यांनीं आपली दृष्टि दुसरीकडे वळविली होती. संध्यारंग नाहींसे होऊन काळसर छाया पाण्यावर नाचूं लागल्या होत्या. “ कुणी कांहीं म्हणो. ज्याला उभ्या आयुष्यांत कधींही कसलाही मोह पडला नाहीं असा मनुष्य जगांत असेल कीं काय याची मला शंकाच वाटते. खुद्द माझे मालक तांदळाच्या गोणामागें रुपया दोन रुपये गरिबांकडून उकळून गबर होत असलेले मला दिसत होते. मराठी शाळा तपासायला, येणारे अधिकारी दरिद्री मास्तराकडून काथ्यापासून काजूपर्यंत जिन्नस नेत हें मी डोळ्यांनीं पाहत होतों.. जत्रांतल्या जुगारांत पैसे मिळवून बांधलेलीं दुमजलीं घरें माझ्या डोळ्यांपुढें उभीं होतीं. माझ्या बायकोच्या अंगावर फुटका मणि नव्हता. पण गांवच्या कुळकर्ण्यानें महिना दहा रुपये पगाराच्या आधारावर आपल्या बायकोला सोन्यानें मढवून काढिली होती. माझें मन म्हणूं लागलें—हीं सारीं लहानमोठीं पापें जगाला चालतात. या पापी लोकांचा सगळीकडे उदोउदोही होतो. मग ही सोन्यासारखी संधि आली असतांना तूं जर तुकारामाचा आव आणशील तर तुझ्यासारखा करंटा तूंच. कुटुंबाच्या सत्यानाशाचें खापर तुझ्याच डोक्यावर फुटेल. एका कोटाची काय कथा ? तुला बायकोचे कष्ट कमी करतां येतील. तुझा मुलगा हुषार आहे. त्याला कॉलेजांत जायला पहिल्यांदा मदत हवी—ती मिळेल. मुलगा शिकून सवरून चांगला मिळविता झाला कीं कुटुंबाचे पांग फिटतील. जग सावांचें नाहीं, चोरांचें आहे ! मात्र चोरानें असें चाललें पाहिजे कीं आपल्या पावलांचा पुसट मागसुद्धां मागें राहूं नये. ”

ते बोलत होते तें अक्षरशः सत्य होतें. पण किती कटु! प्रत्येक पिढीबरोबर सत्यावर बसलेलीं कटुपणाचीं पुटें कमी होण्याऐवजीं वाढतच आहेत!

" संध्याकाळीं त्या नोटा घरीं न्यायच्या असा निश्चय करूनच त्या दिवशीं दुपारीं मी दुकानांतून निघालों. कोटाच्या खिशांत हात घालून पाहिलें. महिन्याचे पांच दिवस जायचे होते. पगारापैकीं फक्त एक रुपया सात आणे शिल्लक होते. मी विचार केला—उद्यां आपल्या हातात पांचशे रुपये यायचे आहेत. मग आज हात थोडा सैल सोडायला काय हरकत आहे? कशी छान मासळी आली होती त्या दिवशीं बाजारांत. एकदम चार आण्यांची घेतली मी. पिकीं केळीं, दोन भाज्या, सात आण्यांत जिवाची मुंबई करून टाकली घटकेंत. फक्त एक रुपया खिशांत शिल्लक ठेवून मी घरीं आलों.

" माझ्या हातांतील बाजार पाहून बायको चकितच झाली. तिला वाटलें कुणीतरी बडा पाहुणा येणार आहे आज आपल्याकडे. पाहुणा-बिहुणा कुणी नाहीं म्हणून सांगतांच तर तिचें आश्चर्य अधिकच वाढलें. आपल्या नवऱ्याला वेडबिड तर लागलें नाहीं ना अशी शंकासुद्धां आली असेल तिच्या मनांत. पण मी त्या पांचशे रुपयांच्या धुंदींत होतों. विमानांत बसण्याचा योग आला नाहीं अजून मला. पण उंच गेल्यावर जमिनीवरल्या साऱ्या वस्तु अगदीं मुलांच्या खेळण्यासारख्या दिसत असतील तिथून! कुठल्याही धुंदींत इतर सर्व व्यवहार असेच क्षुद्र वाटतात मनुष्याला "

चांगलाच काळोख पडला होता. पश्चिम दिशा पूर्णपणें काळवंडून गेली होती. काळ्याकुट्ट दिसणाऱ्या समुद्राच्या लाटांच्या आवाजांतही एक प्रकारची भीषणता भासत होती. माझे प्रेमळ सासरे माझ्याशीं बोलत नसून कुणा तरी कठोर अनोळखी मनुष्याच्या तोंडून मी ऐकत असलेले शब्द येत आहेत अशी विचित्र कल्पना माझ्या मनांत येऊन गेली.

पुढ्यांतल्या वाळूशीं हातानें चाळा करीत ते म्हणाले, "मी जेऊन उठतों न उठतों तोंच एक गरीब मुलगा दत्त म्हणून माझ्या दारांत आला. आठवड्यांतून एक वार पाहिजे होता त्याला. माझें मन कळवळलें. पण दुसऱ्याकरितां चार पैसे तरी खर्च करण्याची शक्ति मला कुठें होती? एकदां वाटलें पांचशे रुपयांचें पाप पचवायचें आहे आपल्याला. असें एखादें पुण्य गांठीं असलें तर उपयोग होईल त्याचा. पण हा विचार आला तसा गेला. स्वतःचीं मुलेंसुद्धां एखादे वेळीं जिथें जड वाटूं लागत, तिथें—

"माझा नकार कानांवर पडताच तो गयावया करून म्हणाला, "एखादा कोट तरी द्या जुना." मी विचार केला—आतां कोटांना काय तोटा आहे आपल्याला? द्यावा तो जुना याच्या अंगावर फेंकून. लगेच कोट त्याच्या अंगावर टाकून जड जेवणानें आलेली सुस्ती घालविण्याकरितां मी आडवा झालों. घटकाभर डोळा लागला असेल नसेल. एकदम झोंपेंत वाटलें मालकांचे धाकटे भाऊ कपाट उघडून पाहत आहेत. त्या दप्तरांतील नोटांचें पाकीट त्यांना दिसायला काय वेळ? पुऱ्या झालेल्या हिशेबांत ही रक्कम नाहीं हें स्वारीच्या लक्षांत यायला उशीर लागणार नाहीं. पूर्वी प्रत्यक्ष तिजोरींतल्या रकमा जिथें गृहस्थानें बेशक उचलल्या होत्या—

"स्वतः पकडलेला उंदीर एक मांजर दुसऱ्याला कधीं तरी देईल कां?

"मी ताडकन् उठलों आणि पैरण घालूं लागलों. बायको म्हणाली "ऊन थोडं खालीं होऊं दे कीं—"

"मी उत्तर दिलें "दिवाळी जवळ आली आहे ना? हिशेबाच्या कटकटींतून मोकळं व्हायला हवं एकदां." ती बिचारी काय बोलणार? संध्याकाळीं बाजारांतून येतांना चहासाखर आणायला तिनें सांगितलें. चहासाखर आणायची. पण पैसे? शिल्लक असलेला अवघा एक रुपया त्या देऊन टाकलेल्या कोटांतच होता. खिसे चांगले पाहून दिले होते मी. पण तो कांहीं कुठें हाताला लागला नव्हता. लगेच

आठवलें–त्या कोटाचा उजवा खिसा फाटका आहे. तेव्हां तो रुपया त्यांत कुठें तरी जाऊन बसला असेल. मनांत आलें–तो मुलगा आतां थोड्याच परत आणून देणार आहे तो रुपया ! जगांत लबाडी कांहीं शिकवावी लागत नाहीं कुणाला ! संध्याकाळीं पांचशे रुपये जवळ असले तरी त्यांतली नोट इथल्या बाजारांत कांहीं मोडून चालणार नाहीं. कांहीं झालें तरी उधारी करायची नाहीं या माझ्या बाण्याला हरताळ लागण्याचा प्रसंग आला.

" त्यामुळें असेल किंवा दिव्याखालीं अंधेर असतो त्याप्रमाणें मोहाच्या मागोमाग मनस्ताप येतो त्यामुळें असेल, वाटेनें जातांना माझें मन सुन्नच होतें.

" मी दुकानापासून जवळ जवळ हांकेच्या अंतरावर गेलों असेन. कुणी तरी मागून जोरजोरानें ओरडत आहे असें मला वाटलें. वळून पाहतों तों दुपारीं ज्याला कोट दिला होता तो मुलगा धांवत येत होता. मी जागच्या जागीं थांबलों. तो येऊन धापा टाकीत उभा राहिला. त्याच्या कपाळावरून घामाच्या धारा निथळत होत्या. बिचारा इतका दमला होता, कीं त्याच्या तोंडांतून शब्दच फुटेना. पण डाव्या हातांतील त्या जुन्या कोटाकडे बोट दाखवून त्यानें घामानें ओलाचिंब झालेला रुपया माझ्या हातांत ठेवला. त्या रुपयाच्या स्पर्शानें मला काय वाटलें हें सांगणें अगदीं अशक्य आहे. अर्धांगवायु झालेल्या शरीराच्या भागाची हालचाल विजेच्या उपायानें सुरू होते असें मी ऐकिलें होतें. मोहानें निश्चेष्ट झालेल्या माझ्या मनावर त्या रुपयाचा तसाच परिणाम झाला. "

बोलतां बोलतां ते एकदम थांबले. डोळयांत उभें राहिलेलें पाणी त्यांनीं झर्रकन पुसून टाकलें असाही भास झाला मला. मी समोर पाहिलें. अंधार पडून पुष्कळ वेळ झाल्यामुळेंच कीं काय, तो आतां उजळल्यासारखा दिसत होता. समुद्राच्या लाटांच्या आवाजांतली मधुर तालबद्धताही आतांच प्रथम माझ्या ध्यानांत आली. ते पुढें म्हणाले " भर उन्हांतून धांवत आलेल्या त्या मुलाला घेऊन मी दुकानावर गेलों.

मालक तक्क्या उशाशीं घेऊन लवंडले होते. त्यांनीं आश्चर्यानें विचारलें, " इतक्या उन्हासेचे आलांत?" मी कांहींच उत्तर दिलें नाहीं. " हा मुलगा कुठला?" " गरीब आहे बिचारा. वार हवाय् त्याला एक." मालक चटकन् " येऊं दे कीं आमच्याकडे " असें म्हणतील अशी आशा होती मला. पण ते डोळे मिटून स्वस्थ पडले. मी पेटीवरल्या किल्ल्या घेऊन तें जुनें दप्तर काढलें आणि त्या पांचशेंच्या नोटा हातांत घेऊन बाहेर आलों. " हे पांचशे रुपये–

माझे शब्द ऐकतांच मालकांनीं डोळे उघडले. त्या रकमेची हकीगत ऐकतांच त्यांनीं माझ्याकडे विलक्षण नजरेनें पाहिलें. मनुष्य इतका प्रामाणिक असूं शकतो अशी कल्पनाच नव्हती त्यांची. त्यांनीं त्या मुलाला वार दिला, पुढें माझा मुलगा मॅट्रिकमधें वर आला तेव्हां त्याला कॉलेजांत जायला मदतही केली. या कोटानें माझा अधःपात टाळला त्या दिवशीं. त्यामुळें तो मला इतका आवडूं लागला कीं सणावारींसुद्धां–बाकी गांवांतले लोक या कोटामुळेंच कद्रू म्हणतात मला."

हंसत हंसत ते उठले. मीही टोपीवरली वाळू झाडीत उठलों आणि बॅटरीचा प्रकाश पाडला. समुद्राला भरती येऊं लागल्याचीं स्पष्ट चिन्हें दिसत होतीं. प्रसन्न मनानें मी वर पाहिलें. अंधारांत चमकणाऱ्या ध्रुवाचें तेज किती मोहक दिसलें त्या वेळीं!

(१९३६)

———

# दोन चित्रें

त्या दोन चित्रांपैकीं अधिक मोहक कोणतें हें अनेक रसिकांना-सुद्धां सांगतां येईना. मग सामान्य प्रेक्षकांची काय कथा ! एक रंगेल तरुण तर तीं दोन्ही चित्रे पाहून उद्गारला, " प्रियकरिणीच्या गालांत डावं उजवं ठरवायचं तरी कसं बुवा ? "

तसें पाहिलें तर त्या चित्रांत साम्यापेक्षां विरोधच अधिक होता. एकाचें नांव ' स्वप्न, ' तर दुसऱ्याचें ' जागृति !' 'स्वप्नां'त एक सतरा अठरा वर्षांची सुंदर तरुणी दाखविली होती. झोपेंत तिचा पदर बाजूला सरकल्याचें दृश्य चित्रकारानें रेखाटलें होतें. स्वप्नांत भेटलेला प्रियकर पाहण्याकरितां ती डोळे उघडते, तों समोर कुणी नाहीं असें तिला दिसून येतें. स्वप्नांतील प्रियकराची अंधुक मूर्ति मोहक रीतीनें चित्रित करण्यांत जें कौशल्य चित्रकारानें व्यक्त केलें होतें तेंच तिचा बाजूला पडलेला पदर यथार्थ रीतीनें प्रतिबिंबित करण्यांतही प्रगट होत होतें.

' जागृति ' मधील स्त्रीचा पदरही बाजूलाच झाला होता. पण ती वयानें थोडी प्रौढ—सुमारें पंचवीस वर्षांची— असावी. तिचें सातआठ महिन्याचें तान्हें मूल नुक्तेंच जागें होऊन आनंदानें आईचें दूध पीत होतें. एका हातानें आईच्या पदराशीं खेळत, मधून मधून अर्ध्या उघड्या डोळ्यांनीं तिच्याकडे लाडिकपणानें पाहात, त्या बाळ—जीवाचें स्तनपान चाललें आहे असें तें दृश्य होतें. बालकाची मूर्ति आणि त्यानें बाजूला केलेल्या आईच्या पदराचें चित्रण या गोष्टी कलावंताच्या कौशल्याचे साक्षीदारच होते.

प्रदर्शनांतील चित्रांना लहानमोठीं अनेक बक्षिसें ठेविलीं होतीं. पण सुवर्णपदकें अवघीं दोनच होतीं. एक, ज्या आर्यधर्मभूषण सरदार इंगळ्यांच्या पुरस्कारानें हें प्रदर्शन भरलें होतें त्यांचें व दुसरें लोकांच्या देणग्यांमधून ठेवलेलें. प्रत्येक चित्रकारानें

आपलें नांव मोहरबंद पाकिटांत घालून त्याच्यावर चित्राचें नांव लिहिलें होतें. त्यामुळें निकालांत पक्षपात होण्याचा मुळींच संभव नव्हता. झिटापिशिअम बोल्शेव्हिझमपर्यंत सर्व विषयांचें ज्ञान वृद्ध सरदारसाहेबांना असल्यामुळें ते आपल्या पदकाकरितां कोणत्या चित्राची निवड करतात इकडे जसें लोकांचें लक्ष होतें, त्याप्रमाणें लोकांची आवड आपल्याशीं कितपत जुळते हें पाहायला इंगळेसाहेबही उत्सुक होते.

निकालाच्या दिवशीं प्रेक्षकगण उपस्थित झाला. ज्यांनीं प्रदर्शनांत चित्रें ठेविलीं होतीं ते कलावंतही उत्सुकतेनें आले. सरदार साहेबांना अध्यक्षस्थान अलंकृत करण्याचा जन्मसिद्ध हक्कच होता. त्याची अंमलबजावणी करून त्यांनीं चित्रकलेविषयीं प्रास्ताविक भाषण केलें. प्राचीनकाळीं आपल्या देशांत या कलेचा किती उत्कर्ष झाला होता हें सांगतांना त्यांनीं संस्कृत कवींच्या रमणींच्या स्तनाग्रांवर नखांनीं चित्रें काढण्याच्या कल्पनेचाही उल्लेख केला. तरुण श्रोत्यांनीं टाळ्यांच्या कडकडाटांत त्यांच्या या सूक्ष्म संशोधनाचें स्वागत केलें.

नंतर सरदारसाहेबांनीं आपला स्वतःचा निकाल जाहीर केला. त्यांच्या मतें ' जागृति ' हें चित्र उघड उघड उत्कृष्ट होतें. स्वतःच्या सुवर्णपदकाप्रमाणें जनतेचें सुवर्णपदकही त्याच चित्राला मिळेल असें त्यांनीं मोठ्या आत्मविश्वासानें सांगितलें.

प्रदर्शनाच्या वेळीं प्रेक्षकांचीं मतें नोंदविण्याची व्यवस्था केली होती. त्या मतांची आतां मोजणी झाली. लोकांच्या दृष्टीनें ' स्वप्न ' हें चित्र ' जागृती 'पेक्षां सरस ठरलें.

सर्वज्ञ सरदार इंगळे क्षणभर गडबडले. पण पानिपतावर धारातीर्थी पडलेल्या वीराचे ते वंशज होते. त्यांनीं पदकदानाच्या समारंभाला एकदम सुरवात केली. गीतेंतला कां गरुडपुराणांतला एक संस्कृत श्लोक म्हणून व त्याचा अन्वय अर्थ सांगून ते बोलते झाले " दोन्ही पदकें एकाच चित्राला मिळालीं असतीं तर दुधांत साखर पडली असती. पण ती चहांत पडावी अशी प्रभु रामरायाची इच्छा होती. ईश्वरी इच्छेपुढें कुणाचा इलाज आहे ? बहुजनसमाज नेहमीं चुकत असतो

असें एका पाश्चात्य लेखकानें म्हटलें आहे. सेन नांव आहे त्याचें. गणनाथ सेन कीं—( श्रोत्यांतून एक ओरडतो ' इब्सेन ' )—असेल, तेंही असेल. पाश्चात्य लेखकांशीं नांवापुरतासुद्धां संबंध ठेवणें फार धोक्याचें आहे. एकजण सांगतो–वाटेल त्या बाईनें वाटेल त्या बोवाचा हात धरून वाटेल तें करावें, तर दुसरा उपदेश करतो देवबिव सब झूट आहे. युरोपांत पेशवाई असती तर असल्या लेखकांना हत्तीच्या पायीं दिलें असतें. निदान त्यांची गाढवावरून धिंड तरी निघालीच असती, पण–"

सरदारसाहेबांबरोबर श्रोत्यांनींही सुस्कारा सोडला. भलत्याच रुळांवर जाणारी त्यांच्या वक्तृत्वाची आगगाडी ' पण ' पाशीं एकदम थांबते असा श्रोत्यांचा आजपर्यंतचा अनुभव होता. आपल्या पांढऱ्या शुभ्र मिशांवरून हात फिरवीत सरदार गर्जू लागले " जागृति हें चित्र स्वप्नापेक्षां अधिक चांगलें आहे हें एखादा आंधळाही सांगू शकेल. आपल्या देशाला आज कशाची जरूर आहे. ? स्वप्नांची ? छेः, छेः ! स्वप्नांतसुद्धां असें कुणी म्हणणार नाहीं. देशाला जागृति हवी आहे जागृति ! आतां स्वप्नें पुरे झालीं. अलीकडे पाश्चात्य देशांत स्वप्नांचें स्तोम फार माजत चाललें आहे. लॉइड जॉर्ज कीं लॉइड हॅरोल्ड–( श्रोत्यांतून पुन्हां आवाज ' फ्रॉइड ' ) – असेल, कुणीही असेल. या नवमत-वाद्यांचें नांव घेणें हेंसुद्धां पाप आहे मोठें. "

हॅम्लेटच्या सर्व भूमिकांना आपल्या अभिनयानें लाजवीत सरदारसाहेब म्हणाले, " हें चित्र पहा आणि हें चित्र पहा. दोन्ही चित्रकारांच्या कलमांचें कौशल्य कुणीही कबूल करील. पण एकाला आर्यहृदय आहे. दुसरा पाश्चात्याच्या जडवादाला बळी पडला आहे. जागृति हें आर्यसंस्कृतीचें मूर्तिमंत चित्र आहे. आई मुलाकरितां केवढा स्वार्थत्याग करते याचें हें दृश्य पाहून कोण सद्गदित होणार नाहीं ? हें चित्र पाहतांना मला सुद्धां लहान मूल व्हावेसें वाटलें. आतां 'स्वप्न' पहा. यांत त्याग आहे कां कांहीं ? कलेच्या क्षेत्रांत भलता सोंवळे-पणा मानणारा मनुष्य मी नाहीं. पण स्वप्न या चित्रांतल्या बाईचा

पदर चित्रकारानें जरा व्यवस्थित राहूं दिला असता तर काय बिघडलें असतें ? जागृतिमधील बाईचा पदर बाजूला झालेला आहे खरा; पण तो तिच्या चिमण्यानें—छबकड्यानें—छकुल्यानें—हातानें धरून ओढल्या-मुळें ! स्वप्नामधें तसें कांहींच नाहीं. पदर बाजूला व्हायला कांहीं कार्य-कारण भाव नको कां ? ( हंशा ) आपणांसारख्या सुज्ञांना यापेक्षां अधिक काय सांगायचें ? ”

“ बहुजन समाजाची अभिरुचि अजून सुसंस्कृत झाली नसल्यामुळें त्याच्याकडून स्वप्न या चित्राला पदक मिळालें आहे. हीं मतें अल्लड तरुणतरुणींचींच असावींत ! तसा मी शृंगाराविरुद्ध आहे असें मुळींच नाहीं. माझीं चार लग्नं झालीं असून मला सतरा मुलें, नऊ नातवंडें व तीन पणतवंडें आहेत, हें जगजाहीर आहे. पण शृंगार झाला तरी तो आर्यशृंगार हवा. ऋषिमुनींच्या या पुण्यभूमीला शोभणारा शृंगार हवा ! वेडावांकडा पाश्चात्य शृंगार नको. आतां वेळ फार झाला आहे. तेव्हां सर्व कलावंतांना आमचें आग्रहाचें सांगणें एवढेंच आहे कीं त्यांनीं जागृति काढणाऱ्या चित्रकाराचें अनुकरण करावें. स्वप्न काढणाऱ्या चित्रकाराच्या पावलावर पाऊल टाकून समाजाला अधोगतीला नेऊं नका. ”

भाषण आवडल्यामुळें कीं संपल्यामुळें कुणाला ठाऊक! पण टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला. ‘जागृति’ चित्राचें पाकीट फोडून चित्रकाराचें नांव जाहीर करण्यांत आलें. यशस्वी चित्रकार पुढें आला. तिशी नुक्ती उलटलेली, गौरवर्ण, सडपातळ अंगलट, मुखावर मधुर स्मित. वृद्ध सरदार साहेबांनाही त्यांना पाहून आनंद झाला. पदक घेऊन सर्वांना नमस्कार करतांना त्या चित्रकाराचे डोळे लोकांना स्पष्ट दिसले. जगांतल्या हरतऱ्हेच्या चंचल सौंदर्याचें चटकन् प्रतिबिंब घेणारें पाणी त्यांच्यांत चमकत होतें.

सरदारसाहेबांच्या हातून पदक घेण्याकरितां ‘ स्वप्न ’ काढणारा चित्रकार पुढें येईल कीं काय याची आतां सर्वांनाच शंका वाटूं लागली

होती. पण या शंकेपेक्षांही त्या चित्रकाराचें नांव जाणण्याची इच्छा त्यांच्या मनांत अधिक तीव्र झाली.

चिटणीसांनीं पाकीट फोडून नांव पाहिलें. त्यांच्या तोंडांतून शब्दच उमटेना. सरदारसाहेब त्यांच्याकडे पाहतच राहिले. पण चिटणीसांना कांहीं केल्या वाचा फुटण्याचें लक्षण दिसेना. त्यांनीं त्यांच्या हातांतील कागद खसकन् ओढून घेऊन पाहिला. चिटणीसांना झालेला रोग सांसर्गिक आहे हें प्रेक्षकांना कळून चुकलें. सरदारसाहेबही पुतळ्याप्रमाणें स्तब्ध बसले.

शेवटीं प्रेक्षकांना कळलें कीं 'स्वप्न' हें चित्रही पहिल्याच चित्रकाराचें आहे. त्यांना धक्का बसला; पण त्यांत आनंदाचाच अंश अधिक होता.

सरदारसाहेबांनीं होतें नव्हतें तवढें प्रसंगावधान गोळा केलें. पानिपतावरील आपल्या शूर पूर्वजाचें स्मरण करून त्यांनीं त्या चित्रकाराला द्वंदयुद्धाचें आव्हान दिलें.

'हें दुसरं चित्रही तुमचंच आहे?'

'हो!'

'फार पूर्वी—शाळेंत असतांना काढलं असेल हें!'

'छेः! एकाच वेळीं काढलीं दोन्ही प्रदर्शनाची योजना जाहीर झाल्यावर.'

'हें दुसरं चित्र एखाद्या इंग्रजी चित्रावरून घेतलं असेल बहुधा! नाहीं?'

चित्रकाराच्या चेहऱ्यावर तिरस्काराची छटा येऊन गेली.

'दोन्ही चित्रें आपल्याच समाजांतलीं आहेत.' तो शक्य तितक्या शांतपणानें म्हणाला.

'आपल्या समाजांतलीं?'

'हो. तुमच्या आमच्या सर्वांच्या घरांतलीं. या दोन्ही चित्रांतले अनुभव माझेच आहेत. आयुष्यांतल्या उत्कट क्षणांचें सौंदर्य कलावंताच्या हृदयांत नेहमीं जागृत असतें. पहिल्या चित्रांतला सुखक्षण मी

अलीकडे अनुभवला. स्वप्नांतला सुखक्षण पांचसहा वर्षांपूर्वीचा आहे. एवढाच काय तो या दोन चित्रांत फरक ! '

सरदारसाहेब मनांतल्या मनांत रामरक्षा म्हणूं लागले.

दुसरे दिवशीं स्वप्न हें चित्र विकत घेण्याच्या इच्छेनें चित्रकाराकडे कांहीं रसिक गेले. तें आधींच विकलें गेलें होतें. एका दृष्टीनें या गोष्टींत आश्चर्य करण्यासारखें कांहींच नव्हतें. त्यांनीं सहज हें विकत घेणाऱ्या कलाप्रेमी मनुष्याचें नांव विचारलें. चित्रकार क्षणभर गोंधळून उत्तरला ' सरदार इंगळे '. आर्यधर्मसंरक्षक ही एका शंकराचार्यांनीं दिलेली पदवी त्यांच्या नांवापूर्वी लावण्याचें भानच राहिलें नाहीं त्याला.

असलें चित्र नेहमीं लोकांच्या दृष्टीला पडून आर्यसंस्कृतीला धोका येईल या भीतीनेंच त्यांनीं तें विकत घेतलें असावें ! बंगल्यांतल्या दिवाणखान्यांत तरी तें लावायची सोय कुठें होती ? येणारे जाणारे लोक तिथेंच नेहमीं बसत. त्यांची आर्यसंस्कृति--

तो प्रश्न सोडून दिला तरी घरांतलीं सतरा मुलें, त्यांच्या दहाबारा बायका, नऊ नातवंडें आणि तीन पणतवंडें यांच्या दृष्टीला तें चित्र सहज पडेल असें लावण्याइतके सरदारसाहेब गाफील नव्हते. नाइलाजानें त्यांनीं तें आपल्या रंगमहालांतच टांगलें.

( १९३६ )

---

# सुंदर चित्र

खास अंकासाठीं चित्राची मागणी आणि तीहि सर्वांत श्रेष्ठ अशा मासिकाकडून. मग—ब्रह्मानंद निराळा थोडाच असतो? शेतकऱ्याच्या सुंदर मुलीला स्वतःच्या रूपाची जाणीव नसते असें नाहीं. पण—पण राजपुत्र मागणी घालायला आला कीं तिच्या अंतःकरणात आश्चर्याच्या लहरी उसळत नाहींत का? त्या तरुण चित्रकाराची स्थिति अशीच झाली.

त्याच्या मनःश्चक्षूंपुढें एक गगनचुंबी मंदिर उभें राहिलें. 'या सुंदर मंदिराचा पाया आज आपल्याला भरायचा आहे. असं मोहक चित्र निघालं पाहिजे कीं—'

सकाळ संध्याकाळ तो समुद्रतीरावर जाऊन बसूं लागला; वद्य अष्टमीचा ऐन मध्यरात्रींचा चंद्रोदय त्यानें पाहिला; टेंकडीवरून दिसणाऱ्या भोंवतालच्या यक्षभूमीचें त्यानें निरीक्षण केलें; पण त्याचें मन कुठेंच रमेना. भूक लागलेल्या तान्ह्या बाळाला ताई, काकी, मावशी यांनीं कितीहि कुरवाळलें तरी त्याची किरकिर कशी थांबणार? त्याला आईनेंच पदराखालीं—

त्याच्या तृषित कला-दृष्टीला त्याची माता दिसली. शेतांतल्या पायवाटेनें जात असताना त्यानें सहज उजवीकडे पाहिलें; पेरे नुकतेच पुरे झाले होते. हिरव्यागार मळयाच्या एका मधल्या भागांत कांहीं कबु-तरें डौलानें बसलीं होतीं. लांबून पहाणाराला मधेंच कुणीतरी पांढऱ्या शुभ्र फुलांच्या राशी करून ठेवल्याचा भास झाला असता. चित्रकाराचीं पावलें हळूहळू त्या बाजूला वळलीं. कबूतरें मधून मधून माना मुरडून इकडे तिकडे पहात होतीं, मधूनच चोंचीनें कांहीं तरी टिपीत होतीं. हिरव्या गालिच्याच्या मध्यभागीं चाललेल्या त्यांच्या नाजूक चाळयांतील नृत्यकौशल्य पाहून चित्रकार मुग्ध झाला. उंच माडांची पार्श्वभूमि, नुक-त्याच रुजलेल्या भाताचा कोमल हिरवा रंग, पांढरीं शुभ्र कबुतरें—किती

सुंदर दृश्य ! अमेरिकेच्या किनाऱ्यावर पाऊल टाकतांना कोलंबसाला किती आनंद झाला असेल याची चित्रकाराला आतां कल्पना आली.

आपण कवि नाहीं म्हणून त्याला वाईट वाटलें. किती मनोहर दृश्य होतें तें ! निरभ्र आकाशांत चमचम करणारा तारकापुंज, रमणीच्या पदरावर रुळणारी टपोऱ्या मोत्यांची माळ. किती तरी सुंदर कल्पना त्या सुंदर कबुतरांना पाहून त्याला सुचल्या ! आपली चाहूल लागली कीं कबुतरें भुर्रकन उडून जातील म्हणून तो थोडासा दूरच उभा राहिला. 'हें दृश्य मला रेखाटतां आलें तर—किती नाजुक पांखरें ! आणि त्यांच्या हालचाली तरी किती गोड ! या सुंदर चित्राची मोहिनी—' अपत्यहीन स्त्री गोजिरवाण्या मुलाकडे ज्या उत्कंठित दृष्टीनें पाहते ती यावेळीं त्याच्या रसिक नेत्रांत दिसत होती.

'हूः हूः हूः' या कठोर उद्गारांनीं त्याच्या कलासमाधीचा भंग झाला. कासटी नेसलेला एक काळा कुळकुळीत मनुष्य दुरूनच त्या कबुतरांना भिववीत चित्रकाराकडे येत होता. त्याचे कर्णकर्कश उद्गार ऐकून आपल्या समाधीचा भंग करणाऱ्या मनुष्याकडे एखाद्या कोपिष्ट ऋषीनें पहावें त्याप्रमाणें चित्रकार त्या अडाणी मनुष्याकडे पाहूं लागला. शेतकऱ्यासारखा दिसणारा तो मनुष्य जवळ येतांच चित्रकार रागानें म्हणाला 'अरे वेड्या——'

'मी येडो ? आणि तूं मात्र शाणो नाय मोटो !' तो तिरसटपणानें म्हणाला.

'कशीं छान बसलीं होतीं बिचारीं पांखरं !'

'अगदीं पोटोकरतांच बसललीं, नाय तीं ?'

'फोटो नाहीं, पण चित्र काढणार होतों ना मी त्यांचं ?'

'तुमचा चितार झालला, पण माझीं पोरांबाळां मरतलीं होतीं त्याचां ?'

चित्रकार आश्चर्यानें त्याच्याकडे पाहूं लागला. कलेला जीवन देणाऱ्या कबुतरांचा आणि या अडाणी मनुष्याच्या पोराबाळांच्या मरणाचा काय संबंध ?

‘ खूळ लागलंय तुला–’ तो उपहासानें शेतकऱ्याला म्हणाला.

‘ माका नाय, तुमकांच ! इतको येळ मेरेर उभे व्हतास आणि एक पांखरूं हांबडुंचां झालां नाय तुमच्या हातानं ? कालच पेरलंय् हो कुणगो ! बीच जर खाल्लां कबुतरांनीं, तर उपाशींच मरतीत मा माझीं पोरांटोरां ? ’

\+ + +

खास अंकांत चित्रकाराचें त्याच सुंदर स्थलाचें चित्र प्रसिद्ध झालें. तें सर्वांना आवडलेंहि. त्यांतील कबुतरें मात्र डौलानें शेतांत बसलीं नसून भिऊन भुर्रकन् आकाशांत उडत होतीं.

( १९३२ )

———

# पूल

“ परतीरीं कान्हा चिमणी काठी ।
मुरलीपरी, अधरीं धरी ॥ ”

शाळेंतून नुक्तीच आलेली कुसुम पेटी वाजवून गात होती. संगीतानें शीण नाहींसा होतो म्हणतात. पण माजघरांत जुनें पांढरें पातळ पांघरून पडलेल्या आजींचें मात्र या पेटीनें कपाळ उठलें. त्या पुटपुटल्या ‘पोरटी शाळेंतून आली कीं झाली कटकट सुरू. त्यापेक्षां पुराणाला गेलेलं बरं.’ त्या उठून बाहेर येतात तों छोटा दिनू हातांत एक रंगीत जाहिरात घेऊन नाचतच्च घरांत आला. आजी दिसतांच तो म्हणाला ‘आजी, आजी, कसा छान छान सिनेमा आहे आज!’ त्यानें धांवत जाऊन त्यांच्या पायाला मिठीच मारली असती! पण आजीच्या चेहऱ्याकडे दृष्टि जातांच त्याचें बाळमन चरकलें. ‘ताई, ताई’ करीत तो कुसुमकडे धांवत गेला.

आजींनीं घरांत जाऊन एका फुलपात्रांत तांदूळ घेतले. ‘देवळांत जातें हं’ असें सूनबाईला सांगण्याकरितां त्या वळणार तोंच त्यांना शब्द ऐकू आले “जरा बाळाला घ्यावं हं. सारखा किरकिर करतोय्. आज स्वयंपाकही लवकर व्हायला हवाय् जरा. सिनेमाला–”

सासूच्या मुद्रेकडे दृष्टि जातांच सून गप्प बसली. आजींच्या मनांत आलें–माझें पुराण बुडतें आहे याची काळजी कुणालाच नाहीं. बाळ भोठमोठ्यानें रडत असतांनाच त्या घरांतून बाहेर पडल्या. काल कीर्तनांत ऐकलेला अभंग त्या गुणगुणत होत्या –‘नको नको चित्ता गुंतूं मायाजाळीं.’ रस्त्यावर कुसुमचे शब्द स्पष्ट ऐकू येत होते ‘परतीरिं कान्हा–परतीरिं कान्हा–’ आजींनीं मागें वळून आपल्या मंद दृष्टीनें घराकडे पाहिलें. त्यांना वाटलें—आपण एका तीरावर आणि घरांतलीं सारीं माणसें दुसऱ्या तीरावर आहेत. मधें कुठल्या तरी अफाट

नदीचें काळेंभोर पाणी वाहत आहे. आपण परत या नदीपलीकडे कशा जाणार ? इतर नद्यांना पूल तरी असतात पण आयुष्याच्या नदीवर परमेश्वराला पूल बांधतां येत नाहीं.

+ + + +

आजींनीं जवळजवळ सत्तर पावसाळे पाहिले होते. प्रत्येक पुराबरोबर वाहून येणारा पाचोळा एका जागीं सांठावा त्याप्रमाणें उभ्या आयुष्यांतील दुःखें त्यांच्या शून्य मनांत आतां धिंगाणा घालीत होतीं. शरीर थकलें. घरकाम सुटलें. पण यामुळें मनही उदासीन झालें. दिवस जातां जात नसे. रात्रीं एकदां झोंप मोडली कीं कांहीं केल्या ती पुन्हां येत नसे आणि रात्र मात्र सरत नसे. मुलगा, सून, नातवंडें यांचें जग आपल्यापेक्षां सर्वस्वीं निराळें आहे असें त्यांना अलीकडे वाटूं लागलें होतें. आजी अंथरुणावर उघड्या डोळयांनीं अंधाराकडे पाहत बसत. त्यावेळीं बाकीचीं सर्व माणसें गोड स्वप्नात गुंग झालेलीं असत. खाणें, पिणें, कपडालत्ता, थट्टामस्करी, साऱ्याच गोष्टींत घरांत विलक्षण बदल दिसूं लागला होता त्यांना.

त्या पुराणाला येऊन बसल्या. बोवांची चर्पटपंजरी चालली होती. ‘या जगांत कुणी कुणाचें नाहीं. म्हणून जेहत्ते कालाचे ठायीं जन्मापासून ईश्वरचिंतन करणें हेंच प्रत्येकाचें कर्तव्य आहे. नाममहिमा अगाध आहे.’ घरांत कुणीतरी आजारी असल्यामुळें त्यांनीं त्या दिवशीं पुराण लवकरच संपविलें.

आजींनीं भाविकपणानें हें सर्व ऐकलें. समोरच्या गाभाऱ्यांतली शंकराची पिंडी त्यांना दिसत नव्हती. पण मधूनच त्यांनीं तिकडे पाहून नमस्कार केला. ईश्वर भेटला तरच आपल्या मनाची तळमळ आतां शांत होईल असें त्यांना वाटलें. पण ईश्वर भेटतो स्वर्गात ! स्वर्गात जायचें म्हणजे–मरणाची कल्पना मनांत येतांच त्यांच्या अंगावर कांटा उभा राहिला. मुलगा लहानपणीं आजारी असतांना मला ने आणि माझ्या बाळाला जीवदान दे असा नवस त्या मोठ्या आनंदानें बोलल्या होत्या. त्यानंतर आतां इतकीं वर्षे होऊन गेलीं होतीं

खरीं! पण मरणाची कल्पना त्यांना पूर्वीपेक्षां अधिकच दुःसह वाटूं लागली होती. त्यांचें मन मात्र म्हणे—तुला मरण नको. पण जगून तरी काय करणार आहेस तूं? काय काम आहे तुझं या जगांत?

पुराण चालू असतांनाच त्यांनीं उदासपणानें बाहेर पाहिलें. संध्याकाळच्या काळसर छाया जगाला अंधुक करीत होत्या. झाडावरून पिकलेलीं पानें कर्णकटु आवाज करीत खालीं पडत होतीं. घरट्यांकडे परतणाऱ्या कावळयांची कर्कश कावकाव एकसारखी कानांवर पडत होती. एक विचित्र कल्पना आजींच्या मनांत येऊन गेली—इतर पांखरें कशीं शांतपणानें घरट्याकडे जातात. पण हे कावळे—

पुराण संपायच्या आधींच अंधार पडला होता! आजी सावकाश उठल्या. रस्त्यानें जातांना त्यांना धड कांहीं दिसत नव्हतें. पण उदास मनामुळें त्या अंधारांतहि त्यांना एक प्रकारचें समाधान वाटत होतें.

दारांतच त्यांचे चिरंजीव उभे होते. ते म्हणाले, 'किती उशीर झाला ग आई! त्यांतून अंधारी रात्र—'

आजी न बोलतां आंत गेल्या. देवळाकडे कंदील घेऊन आपला मुलगा आला असता तर ही माया आपल्याला खरी वाटली असती असं त्यांचें मन म्हणत होतें. आंत जाऊन पाहतात तों स्वयंपाकघरांत पाटपाणी झालेलें. कुसुम आणि दिनू सिनेमाला जाण्याच्या आनंदांत दंग होतीं. मुलानें आपल्यालाही चल म्हणावें असें आजींच्या मनांत आलें. मग आपण म्हणूं 'मला दिसत नाहीं कांहीं नाहीं. उगीच कशाला घालायचा पाण्यांत पैसा? मी आपली बाळाला घरीं संभाळीन. तुम्ही पाहून आलांत म्हणजे मला ोंचलें सारें!'

पण हाच बेत सूनबाईनीं सांगतांच विलक्षण राग आला आजींना! तान्हें मूल घरीं ठेवून सिनेमाला जाणाऱ्या सुनेचा चांगला समाचार घ्यावा असेंहि त्यांना क्षणभर वाटलें. पण संध्याकाळची ती विचित्र कल्पना एकाएकीं त्यांच्या मनांत उभी राहिली. आपण

नदीच्या कांठावर, हीं सारीं अलीकडच्या कांठावर ! आतां यांचा आपला काय संबंध ? कांहीं कां करेनात !

त्या देवघरांत देवापुढें जाऊन बसल्या. नंदादीपाच्या वातीनें धरलेली काजळी त्यांनीं पाहिली. पण ती न झाडतां कितीतरी वेळ त्या स्वस्थ बसल्या. शेवटीं देवापुढें डोकें टेंकून त्या सद्गदित स्वरानें उद्गारल्या 'नारायणा, सोडीव आतां याच्यांतून.' त्यांच्या तोंडांतून हे शब्द बाहेर पडले खरे. पण या जंजाळांतून सुटण्याचा मार्ग मरणाखेरीज दुसरा कुटलाही नाहीं हें लक्षांत येतांच त्यांच्या मनाला कसेंसेंच वाटलें. पण परत दुसऱ्या तीरावर जायचें कसें ? मधलें पाणी किती खोल खोल आहे !

फराळाकरितां त्या देवघराबाहेर आल्या, तेव्हां घरांतल्या दुसऱ्या जगाचा निराळेपणा त्यांना अगदीं स्पष्ट स्पष्ट दिसला. आज कित्येक वर्षें पांढऱ्या पातळाखेरीज दुसऱ्या वस्त्राचा स्पर्श आजींच्या अंगाला झाला नव्हता. सिनेमाला जाण्याकरितां नटलेली कुसुम त्यांनीं पाहिली. छीः ! नवें गुलाबी पातळ, तसलाच ब्लाउज, वेणीचें चक्र, डाव्या हातांत मनगटावर बांधलेलें सोन्याचें घड्याळ—तरी बरें, तिनें तोंडाला लावलेली पॉवडर आजींना दिसणें शक्य नव्हतें. मात्र पाणी पिण्याकरितां ती त्यांच्याजवळून गेली तेव्हां कसल्या तरी सेंटचा भपकारा येऊन त्यांनीं नाक मुरडलेंच.

थोड्या वेळानें कुसुमच्या आईचीही तयारी झाली. आजी मनांत म्हणाल्या—त्याच लेकीची ही आई. तीन मुलांच्या आईनें आरशांत पाहून आपली केशरचना करावी ही गोष्ट त्यांना कशीशीच वाटली. असल्या जगापासून आपण दूर दूर जात आहोंत हें एका अर्थी बरेंच होत आहे असा विचार त्यांच्या मनांत आला.

पण बाळाला पाळण्यांत निजवून सर्व मंडळी घराबाहेर पडेपर्यंतच तो टिकला. थोडा वेळ त्या देवघरांत बसून राहिल्या खऱ्या ! परंतु घरांतील भयाण शांततेमुळें त्यांचा जीव कसा उडून गेला. एकदां तर त्यांना वाटलें -- आपण कधींच हें जग सोडून गेलों आहों. कशावर

तरी आशा राहिल्यामुळें आपल्याला भूतयोनींत जावें लागलें. या क्षणीं देवघरांत देवासमोर बसलें आहे तें आपलें भूत–आपण नव्हे.

या विचित्र विचारानें त्यांच्या हृदयाचा थरकांप झाला. देवघराबाहेर येऊन इथला दिवा लाव, तिथला दिवा लाव असें करीत त्या उगीचच घरभर फिरूं लागल्या. स्वयंपाकघराच्या कोंपऱ्याकडे त्यांचें सहज लक्ष गेलें. उंसाचीं पांच सहा कांडीं पडली होतीं तिथें! खालीं चोयट्याही खूप होत्या. उंस सोलून खाण्याची इच्छा त्यांच्या मनांत उसळून आली! दुसऱ्याच क्षणीं त्या भानावर आल्या. तोंडाचें बोळकें झालेलें माणूस उंस सोलून कसा खाणार? त्या चोयट्यांकडे पाहत 'इथून तिथून मेला बुरसेपणा!' असे उद्गार काढून त्या स्वयंपाकघरांतून बाहेर पडल्या.

सूनबाईच्या खोलींतही त्यांचें मन असेंच अस्वस्थ झालें. पलंगाची नाजुक मच्छरदाणी, टेबलावरला भारी किमतीचा फोनोग्राफ, भिंतींना लावलेलीं सुंदर चित्रें–जिथें तिथें उधळेपणाचा बाजार दिसूं लागला त्यांना. मधेंच जमिनीवर पडलेला हातरुमाल लागला त्यांच्या पायाला. किती तलम होता तो! टर्रकन् फाडून त्याचे तुकडे तुकडे करावे इतका राग आला होता त्यांना सुनेचा!

मुलांच्या खोलींत तर या आगींत तेल पडलें. कुसुमच्या टेबलावर आंकड्यांचें संमेलनच भरलें होतें जणुं कांहीं. जवळच एक पुस्तक पडलें होतें. आजींनीं तें उचलून डोळ्यांजवळ नेलें. 'काय चहाटळ झाली आहे कारटी!' असें पुटपुटत त्यांनीं फेंकूनच दिलें तें! ती सामाजिक कादंबरी होती एक. तिच्या मुखपृष्ठावर नायक वांकून नायिकेचें चुंबन घेत होता.

दिनूची साहेबी टोपी खुंटाळ्याला लटकत होती. तिच्याकडे पाहिलें न पाहिलेंसें करून त्यांनीं त्याच्या पाटीवर पडलेलें पुस्तक उचललें. दिव्यापाशीं जाऊन त्यांनीं तें उघडलें. मोठ्या कष्टानें त्यांना एवढींच अक्षरें वाचतां आलीं—

**आजोबांची शेंडी भुरुभुरु कशी पहा हालते ।**
**मनाला मौज किती वाटते ॥**

तिटकाऱ्यानें तें पुस्तक फेकून त्यांनीं घाईघाईनें दार उघडलें. त्या सोप्यावर आल्या. बाहेर गाढ अंधार पसरला होता. अंगणांत एका जीर्ण मेढीवर चढविलेली मोगरीची वेल जिकडे तिकडे सुवास उधळीत होती. पण तो आजींच्या गांवींही नव्हता.

त्या पुन्हां देवघरांत येऊन बसल्या. त्यांचें मन आंधळेपणानें धडपडत, तडफडत होतें. आपण कशासाठीं जगत आहों हें त्यांचें त्यांनाच कळेना. देवाच्या पाटावर डोकें ठेवून त्या स्वस्थ पडून राहिल्या. त्यांच्या मिटून घेतलेल्या डोळयांपुढें त्यांचें उभें आयुष्य एखाद्या पांखराप्रमाणें भुर्रकन् येऊन गेलें. इतकीं वर्षें आपण जगलों हें सुद्धां त्यांचें त्यांना त्या अर्धवट गुंगींत खरें वाटेना. कशासाठीं, कुणासाठीं आपला जीव या दुबळ्या शरीराला अजून चिकटून राहत आहे याचा विचार करकरून त्यांचें मन शिणून गेलें. या शिणामुळेंच कीं काय त्यांचा डोळा लागला.

पण थोड्याच वेळांत कुणी तरी दार खडखडावलें. झोंप मोडल्यामुळें चिडून आजींनीं डोळे उघडिले. नंदादीप शांत झाला होता. अंधारांतच धडपडत त्या दाराकडे आल्या. सिनेमाची मंडळी परत आली होती.

"बाळ उठला होता कां ?" सूनबाईनीं विचारलें. सासूबाई बोलल्याच नाहींत. पाळण्यांत चांचपून पाहत सूनबाई म्हणाल्या 'अगबाई, अगदीं थप्प झाला आहे हा भिजून ! राजा, ओल्यांतच निजला होतास कीं रे !' लगेच त्यांनीं बाळाला पाळण्यांतून काढून त्याचा प्रेमानें मुका घेतला.

हें पाहून मात्र आजींना वाटलें–मघांशी सारें घर आपण सोबतीकरितां धुंडाळलें. बाळाकडे मात्र कांहीं केल्या आलों नाहीं आपण. घरांतल्या इतर माणसांचें जग आपल्यापेक्षां निराळें असेल. पण बाळाचें जग आपल्याहून भिन्न आहे कां ? बाळाला घेण्याकरितां

त्या पुढें होणार होत्या, इतक्यांत सूनबाई रागानेंच त्याला घेऊन एकदम आपल्या खोलींत गेल्या.

अंधाऱ्या देवघरांत जाऊन आजींनीं आपले डोळे पुसले. बाळाच्या जगांत आपण अजूनही रमून जाऊं. पण त्याच्यावर आपला हक्क कुठें आहे? बाळ आतां आपल्या आईच्या कुशींत झोपेंत हंसत निजला असेल आणि आपण–आपला डोळासुद्धां लागणार नाहीं रात्रभर!

एकटेपण–कधींही नाहींसें न होणारें एकटेपण–आपल्या आयुष्यांत दुसरा कसला आनंद आतां उत्पन्न होणार आहे?

नंदादीप लावायचा विचार हजारदां त्यांच्या मनांत आला. पण कांहीं केल्या त्यांना उठावेसें वाटेनाच. 'राहीना देव अंधारांत' असा त्यांच्या श्रद्धेशीं विसंगत असलेला विचारही क्षणमात्र त्यांच्या मनांत येऊन गेला.

इतक्यांत बाळाचें रडणें त्यांना ऐकूं आलें. अगदीं ओक्साबोक्शीं रडत होता तो. आजी जागच्या हलल्या नाहींत. पण लगेच सूनबाईचा स्वर त्यांना ऐकूं आला. 'देवघरांत असतील!'

आजींनीं घाईनें उठून देवाचा दिवा लावला.

बाळाला घेऊन त्याची आई आंत आली. त्यानें एकदम 'आ–दी, आ–दी' करीत आजींच्या अंगावर झेंपच टाकली.

"जागा झाला तो आदी, आदी करीत आपल्याकडे यायचा हट्ट धरून बसला. किती थोपटला खेळवला. पण सारखा आ–आ–आदी करीत होता. आपल्याला त्रास होईल म्हणून–"

"बाळाचा त्रास? असं भलतं सलतं बोलूं नये कधीं सूनबाई." आजी हंसून म्हणाल्या.

बाळाची आई निजल्यावर आजी त्याला खेळविण्याकरितां सोप्यावर घेऊन आल्या. 'दिवू, दिवू' म्हणून त्यांनीं बाळाला आभाळांतील चांदण्या दाखविल्या. आतां त्यांना कल्पना आली. मघांप्रमाणें आतांही खालीं अंधार होता. पण वरच्या चांदण्या कशा चमचम चमकत होत्या. वाऱ्याच्या झुळकेबरोबर मोगरीच्या फुलांचा सुगंधही

अंगणांतून आला. त्या जीर्ण मेढीचें जिणें-जमिनींत पुरून घेऊन एका जागीं राहणें-मोगरीच्या या मधुर वासाकरितां आहे हें मनांत येऊन आजींचें चित्त शांत झालें.

त्यांचें प्रसन्न मन जणुं कांहीं म्हणत होतें ' देवाच्या घरून नुकत्याच आलेल्या आणि देवाच्या घरीं लवकरच जाणाऱ्या जीवाची गट्टी जमायला काय हरकत आहे ? '

आईच्या सांगण्यावरून बाळाला घेण्याकरिता आलेली कुसुम गुणगुणत होती-

**' त्या प्रभातिं गोपाळाशीं**
**पुष्पांच्या दिसल्या राशी**
परतीरीं कान्हा, चिमणी काठीं,
मुरलीपरी, अधरीं धरी. '

बाळाप्रमाणें आजींनाही तें गुणगुणणें ऐकून विलक्षण आनंद झाला.

(१९३७)

---

# सती

माझ्या जन्माच्या वेळी आई नवस बोलली होती कुळदेवीला. मुलगा झाला तर तुझ्या पायांवर तो आणून घालीन म्हणून. नवस म्हणजे परमेश्वराला लिहून दिलेली अखंड प्रॉमिसरी नोट. तो कधींही फेडायला हरकत नाहीं. त्यामुळें कोंकणांतल्या कुळदेवीच्या पायावर घालून घेण्याकरितां मी आलों तेव्हां मला मिसरूड फुटली होती—एवढेंच नव्हे, तर मी तिचा नायनाट करण्याच्या मार्गाला लागल्याला पांचसहा वर्षे होऊन गेलीं होतीं.

कधीं नव्हे ते कोकणांत मूळ घरीं आम्ही आलेलों. लग्न झाल्यावर आई कांहीं वर्षे इथें होती. त्यामुळें रिप् व्हॅन विंकल-सारखी का होईना, या खेडेगावांत तिला गंमत वाटत होती. धरणीकंपाच्या वेळीं प्रत्येक धक्क्यानें मनुष्याच्या मनांत काय काय विचार येत असतात याची चांगलीच कल्पना तिच्या बोलण्यावरून मला येऊं लागली. तिनें पाळण्यांत पाहिलेल्या एका पोरानें भाविणीच्या पायीं घरदाराची राख-रांगोळी केली होती. पूर्वी पाप्याचें पितर असलेला एक मुलगा आतां इतका लठ्ठ झाला होता, कीं त्याच्या पुढच्या बेचाळीस पिढ्या पुण्य-वंतांच्याच होणार असा कुणीही तर्क केला असता. त्या काळीं मारकी म्हैस असलेली एक सासू आज गोगलगाय झाली होती; उलट पोरवयांत सुतासारखा सरळ असलेला एक शेजारचा मुलगा आतां गांवांत भुता-प्रमाणें नंगा नाच घालीत होता.

या ग्रामोद्धाराच्या कार्यांत चार दिवस जाणें आईला कठीण नव्हतें. पण माझी मात्र मोठी पंचाईत झाली. प्रदेश परका, माणसें नवखीं. बरोबर दुभाषी घेतल्याशिवाय बाजारांत जाणेंसुद्धां अशक्य. आणि खेड्यांतल्या नऊ दुकानें लांब व चार दुकानें रुंद अशा त्या बाजारांत बघायचें तरी काय ? दुकानावरले उघडे बोडके दुकानदार, चहाबरोबर भजीं खात असलेला मोटारचा क्लीनर, बुचड्यांच्या रचने-

वरूनच ओळखूं येणाऱ्या ख्रिश्चन बाया, त्यांच्या डोक्यांवरील टोपल्यांत चमकणारे चित्रविचित्र मासे इत्यादि गोष्टी पुनःपुन्हां पाहून मी कंटाळलों. हिवाळ्याचे दिवस असल्यामुळें आंबे, फणस, काजू यांचीं झाडें तेवढीं दिसत. पण तीं पाहून समाधान मानायला मी वनस्पतिशास्त्राचा विद्यार्थी थोडाच होतों !

रविवार असावा तो. मुंबईच्या आदितवाराच्या मौजेची आठवण होऊन मी अगदीं हिरमुसला झालों. तेव्हां आई म्हणाली ' किल्ल्यांतली सतीची शिळा तरी पहायला जा कीं रे ! '

' कितीशी लांब आहे ? '

' असेल दोन तीन मैल. लहानपणीं गोव्यात जातांना पाहिली आहे मीं. '

' गोव्यांत ? '

' गोव्याची हद्दच लागते ना तिथून. मधें नदी आहे काय ती ! '

सिंहगड पाहिलेल्या अस्मादिकांना वाटलें, असेल झालें हा एखादा पडका किल्ला; आणि कुणीतरी धूर्त मनुष्यानें दगडाचा देव करण्याकरितां त्यांतल्या एका शिळेवर उभी राहून कुणीतरी बाई सती गेली अशी गप्प दिली असेल उठवून ! उगीच तंगड्या तोडीत जायचें जीवावर आलें. पण घरीं बसून तरी काय करायचें ? निदान नदीचें दृश्य तरी रमणीय असेल असें वाटून तिसऱ्या प्रहरीं जायचा बेत मी केला. पुढचा प्रश्न होता सोबतीचा. शेवटीं एकदां कष्टानें एक विद्यार्थी मिळाला. स्काऊट होता तो. त्यांची टोळी त्या किल्ल्यावर एकदां तळ देऊन आली होती. बालवीर–चळवळीविषयीं पॉवेल साहेबांचे मनांतल्या मनांत आभार मानल्यावांचून मी राहिलों नाहीं.

ऊन उतरूं लागतांच आम्ही कूच केलें. जवळची वाट म्हणून शेतांतल्या बांधांवरून जातांना मला मोठी गंमत वाटे. प्रत्येक शेत अगदीं बुद्धिबळांच्या पटासारखें दिसे. मधूनच कुठेंतरी दहावीस घरें लागत. तिथल्या कोंबड्यांचें आरवणें आणि मुलांचें खेळणें क्षणभर

ऐकण्यासारखें होतें यांत शंका नाहीं. जिकडे तिकडे हरतऱ्हेची हिरवीं झाडें ! कुंपणावर वेली आळसावून पडल्यासारख्या दिसत अगदीं !

माझा बालवीर मित्र मधेंच मातकट तांबड्या रंगाच्या फुलाकडे बोट दाखवून म्हणाला ‘ हीं पिटकुळीचीं फुलं. देवाला नाहीं चालत तीं ! प्रेताला घालतात म्हणे हीं. बालवीराला प्रत्येक गोष्टीचें थोडें थोडें ज्ञान हवें हे लक्षांत घेतां त्याची माहिती मोठी मोलाची होती. माझ्या मनांत आलें—हीं पिटकुळीचीं फुलें घ्यावीं आणि त्या सतीच्या शिळेवर वहावीं. सती म्हणजे—वाऱ्याच्या लहानशा झुळुकेनेंही पवनचक्की फिरूं लागावी त्याप्रमाणें या कल्पनेनें सतीविषयींच्या माझ्या कल्पनांना गति मिळाली.

लॉर्ड विल्यम बेंटिंग व राजा राममोहनराय याच्या आत्म्यांना माझें मत मूर्खपणाचें वाटेल. पण सतीच्या कल्पनेनें माझ्या मनांत आदराची भावना जागृत झाली हे मी कबूल करतों सतीची चाल अमानुष असेल. युद्धेंसुद्धां अमानुष आहेत. पण तेवढ्यामुळें युद्धांत शौर्य गाजविणाऱ्या वीरांचें कौतुक केल्याशिवाय आपण राहूं काय ? सिंहगडावरला तानाजी अगर किल्ल्यावर निशाण लावून नेपोलियनच्या पायापाशीं येऊन प्राण सोडणारा ब्राउनिंगचा बालवीर—यांच्या नुसत्या स्मरणानें अंगावर रोमांच उभे राहतात. त्यागाचें सामर्थ्यच असें अलौकिक असतें. मग संसाराच्या समरांगणावर हंसत-मुखानें प्राणदान करणाऱ्या सतीची पूजा मानवी हृदयानें केली तर त्यांत आश्चर्य कसलें ?

या किल्ल्यावर सती गेलेल्या बाईच्या आयुष्याविषयीं मला न कळत कुतूहल उत्पन्न झालें. माझ्या बालवीर—मित्रानें त्या शिळेची लांबी रुंदी सांगितली. पण सतीचा इतिहास कांहीं त्याला ठाऊक नव्हता. मी मात्र जातां जातां मिळालीं तीं फुलें गोळा करीत चाललों होतों. त्यांतलीं गोकर्णीचीं निळीं आणि चाफ्याचीं पिवळीं फुलें परस्परांच्या रंगांना विरोधानें विलक्षण शोभा आणीत होतीं.

किल्ला लहानसाच होता. वार्धक्याच्या खाणाखुणा तर त्याच्यावर स्पष्ट दिसत होत्या. ठिकठिकाणीं तट ढांसळून पडलेला, प्रवेशद्वारापाशीं रानवेली माजलेल्या, आंत तर गुडघाभर गवतच होतें सगळीकडे. त्यांतून वाट काढतांना पदोपदीं जिवाणूची भीति वाटत होती मनाला! माझ्या-बरोबर आलेल्या मुलानें मला बालेकिल्ला दाखविला. चारी बाजूंनीं त्याच्या भिंतींना भगदाडें पडलीं होतीं. रंगमहालांत झाडांनीं असा काळोख केला होता कीं बोलून सोय नाहीं. आमची चाहूल लागतांच तिथल्या एका घुबडानें घुत्कारानें माझें स्वागत केलें. काळ किती क्रूर विडंबक आहे याची कल्पना त्या वेळीं मला आली.

नंतर सतीच्या शिळेकडे आम्ही वळलों. एका बुरुजाच्या अलीकडे ती जागा होती. शिळेवर सुकून गेलेलीं फुलें दिसत होतीं. सतीचा वंशज जवळच कुठें तरी राहतो आणि सध्याकाळीं येऊन शिळेची पूजा करून जातो एवढें बालवीराकडून मला कळलें. कांहीं झालें तरी शिळा बोलकी होणार नव्हती! उत्कट आदरानें त्या शिळेवर हातांतलीं चार फुलें मी वाहिलीं. बाकीचीं तशींच होतीं. बुरजावर जाऊन भोंवतालचा देखावा पहावा आणि मग नदीकडे जावें असा माझा बेत होता.

बुरुज चांगला उंच होता. त्याचा खालचा भाग इतका निमुळता होता कीं जर चुकून पाय निसरला तर पडणाऱ्याच्या ठिकऱ्या उडाल्या-वांचून राहणार नाहींत अशी माझी खात्री झाली. छाती धडधडत होती. पण धीर करून मी वांकून खालीं पाहिलें. एक अजस्र काळा खडक आ वासून उभा होता तिथें. माझ्या अंगावर कांटा उभा राहिला. मी भीतीनें मान वळविली.

शिळेच्या पूजेला कुणीतरी मनुष्य आला होता. मी हळुहळु त्याच्याजवळ गेलों. परका मनुष्य पाहून त्यालाही आनंद झाला असावा. बालवीराच्या मदतीनें मी त्याच्याशीं बोलूं लागलों.

‘ शिळा पहायला आला कीं काय ? ’

‘ हो. ’

'फार जुनी आहे ही! तीन चारशें तरी वर्षे झालीं असतील. माझ्या पणजीच्या पणजीच्या–' वंशवृक्षाच्या कुठल्या तरी मोडक्या फांदीवर तो मला नेऊन बसवणार अशी भीति वाटून मी म्हणालों 'सतीच्या वंशांतले आहां म्हणायचे तुम्ही!'

'हो. इथं दररोज येऊन पूजा करावी लागते आम्हांला. मोठं खडतर आहे दैवत. नाहींतर मुलंच जगत नाहींत कुळांतलीं.'

येणारें हंसू दाबून मी प्रश्न केला 'कोण होती ही बाई?'

'किल्लेदाराची बायको. मोठी जागृत आहे ही सती!'

'अस्सं!'

'नावडती बायको असून ती नवऱ्याबरोबर सती गेली. स्वर्गात–'

नावडती बायको सती जाते! आणि आवडती? माझी जिज्ञासा अगदीं अनावर झाली. नावडती बायको ज्या नवऱ्यासाठीं अग्निदिव्य करते त्या नवऱ्याचा विरह आवडत्या बायकोला क्षणभर तरी सोसवला असेल काय? तिनं तात्काळ या बुरुजावरून खालीं उडीच टाकिली असावी! मी म्हटले

'दोन बायका होत्या त्या किल्लेदारांना?'

'हो. दोघीही एकाच दिवशीं हें जग सोडून गेल्या.' आपला तर्क खरा ठरल्याचा आनंद विलक्षण असतो. मी त्याला खूष करण्याकरितां म्हटलें 'स्वर्गातसुद्धां कौतुक झालं असेल या सवतीचं!'

तो उपहासानें उद्गारला 'स्वर्गात दोघी जाणार कशा?'

'कां?'

'ती दुसरी पडली असेल रौरव नरकांत!'

'आवडती बायको?'

'हो!'

आश्चर्याची एवढी मोठी लाट माझ्या मनांत उसळली कीं त्याला प्रश्न विचारावयाचें भानही राहिलें नाहीं मला. पण तोच सांगण्याच्या रंगांत आला होता.

' त्यावेळीं हा किल्ला म्हणजे नाकं होतं कोंकणच्या या बाजूचं. गोमंतक जिंकून फिरंगी इकडे येण्यासाठीं धडपडत होते. नदीच्या पलीकडे त्यांचा तळ पडला होता. इथें किल्ल्यांत काय थोडें सैन्य होतें तेवढेंच. बाकी या बाजूला बारा वाटा मोकळ्या होत्या त्यांना.

'बादशहाकडे खलिता गेला होता. पण तो पोंचून मदत येईपर्यंत एक गोष्ट फिरंग्यांच्या आड येत होती. पावसाळ्याचे दिवस होते ते' त्यांच्यापाशीं होडया नव्हत्या. पलीकडे पावसांत महिनान् महिना राहणें-ही त्यांना शक्य नव्हतें. पांच मैलांवर खालीं एका गुप्त जागीं नदीला पावसाळ्यांतसुद्धां उतार मिळत असे. पण अगदीं किर्र जंगलामुळें त्या बाजूला कुणी सहसा फिरकत नसे. इथल्या किल्लेदाराला तेवढं त्या उताराचें गुपित नेहमीं ठाऊक असे!'

पलीकडच्या गवतांत एकदम सळसळ असें कांहींतरी वाजलें. मी व माझा बालमित्र दोघेहि चमकलों पण तो मनुष्य शांतपणानें म्हणाला ' मोठा दिवड आहे तो. जिवंतपणीं नावडतीला सुख दिलें नाहीं म्हणून किल्लेदार आलाय् दिवड होऊन ! किती तरी वेळा या शिळेवर हा दिवड ऐसपैस पडलेला असतो.'

दिवड शब्दाचें ज्ञान मला कोकणांत आल्या दिवशींच झालें होतें. परसात भला लांब साप पाहून धापा टाकीतच मी घरांत आलों होतों. मग मला कळलें कीं सापाचें विष त्याच्या लांबीरुंदीजाडीवर अवलंबून नसतें. दिवडाला फक्त बुधवारीं आणि रविवारीं विष असतें.

आज रविवार होता. अर्थात्च किल्लेदारसाहेबांची या नव्या रूपांतली भेट घेण्याची कांहीं माझी इच्छा नव्हती. मी म्हटलें

" पुढं काय झालं ?'

' त्याच वेळीं किल्ल्यांत एक कीर्तन झालं. हरिदासानें सांगितलें— सीतामाईनें मारुतीला वर दिला होता त्रेतायुगांत, कीं पुढं तुझ्या जातीचीं माकडं या भूमींत राज्य करतील म्हणून. फिरंग्यांचें सैन्य पाहून किल्लेदार आधींच पेंचांत पडला होता. सीतामाईचा वर खरा होण्याची वेळ आली असें त्याच्या मनानें घेतलें. मध्यरात्रीं उताराच्या वाटेनें फिरंग्यांना

जाऊन भेटायचें, त्यांना ती वाट दाखवायची आणि आपली किल्ले-दारी सुरक्षित राखायची असा बेत केला त्यानें. आपल्या आवडत्या बायको-शिवाय कुणालाही त्यानें याचा सुगावा लागूं दिला नाहीं ! ती अगदीं विरुद्ध होती. तिनें त्याची खूप विनवणी केली. पण किल्लेदार तसा वाइलबुद्धि नव्हता ! '

संध्याकाळच्या उतरत्या उन्हांत भोवतालचें पिवळें गवत कसें फिक्कट दिसत होतें. त्याच्याकडे उदास दृष्टीनें पहात मी ऐकूं लागलों. ' ठरल्याप्रमाणें मध्यरात्रीं तो आपल्या आवडत्या बायकोच्या महालांतून निघाला. ती त्याला म्हणाली ' दूध घेऊन जाव थोडं. '

त्याची दुधावर वासना नव्हती. पण लाडक्या बायकोला असल्या गोष्टींत नाहीं कसं म्हणायचें ? तिनें झटकन् त्याला दूध आणून दिलें. त्याचें मन मुळींच जागेवर नव्हतें. तो तें दूध घटाघट प्याला मात्र— त्या महालांतून दुसरे दिवशीं त्याचें प्रेतच बाहेर गेलें. '

आवडत्या बायकोनें नवऱ्याला विष घालून मारलें. किती अघटित घटना ही ! नवऱ्यानें शत्रूला फितूर होऊं नये म्हणून—

' तिनं विष घातलं खरं. पण नवऱ्याची तडफड पाहून तिचा धीर खचला. सारे लोक गोळा झाले. उपचारांवर उपचार केले. पण विष फार जालीम होतें. आपण तें घातलें एवढं मात्र तिनें कबूल केलं. लोकांनीं जंग जंग पछाडलें तरी कारण मात्र ती सांगेना.

' दुसरे दिवशीं सकाळीं किल्लेदाराच्या दहनाची तयारी झाली. ही सती जाणार म्हणत होती. पण विष घालून नवऱ्याला मारणाऱ्या बायकोला सतीच्या शिळेवर कोण चढूं देणार ? नावडती बायको आनंदानं पुढं झाली. आणि आपल्या सवतीकडे तुच्छतेनें पहात चितेवर चढली. पुढें कितीतरी दिवस सतीचा मोठा उत्सव होत असे या किल्ल्यांत. '

माझें मन किल्लेदाराच्या त्या आवडत्या बायकोचा विचार करीत होतें. त्या बिजेचें पुढें काय झालें ?

माझा प्रश्न जणु कांहीं त्याला कळला. तो सांगू लागला ‘नवऱ्याची हत्या करणारी राक्षसीण म्हणून या बुरुजावरून तिला खालीं लोटून द्यायचें ठरलें. हंसतमुखानें ती बुरुजावर चढली म्हणतात. आपण होऊन उडी टाकावयाचें कबूल केलें होतें तिनें. डोळे बांधून घ्यायलासुद्धां ती तयार झाली नाहीं. बोहल्याकडे जावें तशी ती आनंदानें बुरुजाकडे गेली असें जुनीं माणसें सांगत. पुढें जाऊन तिनें खालीं वांकून पाहिलें. मागें सरकली ती. लोकांना वाटलें पाप भित्रें असतें. उडी टाकायची छाती होणार नाहीं तिला. पण ती बोलण्याकरितां मागें आली होती. आपण नवऱ्याला विष कां दिलें हें तिनें अडखळत हुंदके देत सांगितलें. तिला कडेलोटाची शिक्षा देण्यांत अन्याय होत आहे असें लोकांच्या मनांत येतें न येतें तोंच तिनें खालीं उडी टाकलीदेखील. खालचा खडक रक्तानें रंगून गेला अगदीं. त्या रक्ताचे डाग कितीतरी दिवस तांबडेच होते अशी दंतकथासुद्धां ऐकिली आहे मी लहानपणीं!’

त्याची नजर सहज माझ्या हाताकडे गेली. तो म्हणाला ‘सतीला घाला कीं तीं फुलं. मोठं जागतं दैवत आहे हें!’

मी दोनतीन फुलें त्या शिळेवर टाकलीं.

‘आणि हीं उरलेलीं?’ त्यानें प्रश्न केला.

‘या बुरजाखालच्या खडकाला वाहणार आहे मी तीं. खरी जागृत सती तिथंच आहे कीं!’

(१९३७)

---